


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

विद्वत्प्रमाणित त्रैमासिक
(Refereed Journal)

पुणे । वर्ष ३५ । अंक १ । हिवाळा २०१७ । पृष्ठे ७२ । किंमत ₹ ४०

## शालेय शिक्षण-माध्यम विशेषांक

अनुक्रमणिका








मराठी अभ्यास परिषद पत्रिका भाषा आणि जीवन

संपादक: प्र०ना० परांजपे, H-1 क्लॅरियन पार्क, पुणे 411 067. चलभाष: 94225 09638. ई-पत्ता: pranaparanjpe@gmail.com. संपादन-समिती: विजय पाध्ये, आनन्द काटीकर, विजया चौधरी, सरोजा भाटे, सलील वाघ.

मराठी अभ्यास परिषद पत्रिका हे त्रैमासिक मालक, मराठी अभ्यास परिषद ह्यांच्यासाठी, मुद्रक व प्रकाशक आनन्द काटीकर ह्यांनी एकविरा प्रकाशन व प्रसिद्धी सेवा, सर्व्हे क्र० 1/27+29, माउली सोसायटी, विठ्ठल-मंदिरामागे, कर्वेनगर, हिंगणे, पुणे 411 052 येथे छापून B-5/16, सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051 येथे प्रसिद्ध केले.

| वार्षिक वर्गणी | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| व्यक्तींसाठी | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| संस्थांसाठी | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/-. कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.

मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-.आजीव सदस्यांना पत्रिकेचा अंक पाठवला जातो.

वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, थेट (ऑनलाईन/NEFTद्वारे) भरणा करून (बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे; बचत खाते क्र० 20057164260; IFS Code MAHB0000041) देता येईल. धनादेशाने द्यायची असल्यास धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' ह्या नावाने काढावा. पुण्याबाहेरील कोणत्याही बँकेचा वा शाखेचा असल्यास व 'ॲट पार' वटणारा नसल्यास वटणावळ म्हणून धनादेशाच्या रकमेत ₹ ५०/- भर घालावी. वर्गणीदारांनी कोणत्याही प्रकारे रकमेचा भरणा करताच परिषदेस पत्राने किंवा ई-पत्राने, किंवा 94216 10704 वा 99236 71820 ह्या चलभाष क्रमांकावर लघुसंदेश पाठवून आपले नाव, पत्ता, रक्कम, वर्गणी कोणत्या अंकापासून/वर्षापासून घ्यावी ते कार्यवाहीच्या प्रक्रियेसाठी कळविणे आवश्यक आहे.

जाहिरातींचे दर: पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/-, शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३०००/-.

प्रकाशन: त्रैमासिक; जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

सूचनाः (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या वा लेखकांच्या मतांशी संपादक वा परिषद सहमत असतीलच असे नाही. (२) ह्या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि, ह्या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्यसंस्कृती मंडळ वा राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.

ह्या अंकाची किंमत ₹ ४०/-

## अनुक्रमणिका





# शालेय शिक्षणाचे माध्यम

विजय पाध्ये

दैनिक लोकसत्तेच्या १० ऑगस्ट २०१२च्या अंकात, महाराष्ट्र राज्य माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाचे माझी अध्यक्ष डॉ० वसंत अ० काळपांडे ह्यांचा 'सेमी-इंग्लिश': एक सुवर्णमध्य ह्या शीर्षकाने एक लेख प्रसिद्ध झाला होता. त्या लेखावर मुंबईच्या सोमय्या महाविद्यालयाच्या मराठी विभाग प्रमुख डॉ० वीणा सानेकर ह्यांची प्रतिक्रिया, 'सेमी-इंग्रजी' माध्यम : सुवर्णमध्य की सुवर्णमृग?' ह्या शीर्षकाने लोकसत्तेच्याच १७ ऑगस्ट २०१२च्या अंकात प्रसिद्ध झाली आणि त्यानंतर उन्मेष इनामदार ह्यांची आणखी एक प्रतिक्रिया ३ सप्टेंबर २०१२च्या अंकात प्रसिद्ध झाली. इतर माध्यमांतूनही ह्या मुद्द्यावर उलटसुलट प्रतिक्रिया नोंदल्या गेल्या.

हा विषय सामाजिकदृष्ट्या महत्त्वाचा आहे, तेव्हा शिक्षणक्षेत्रात महत्त्वाची भूमिका पार पाडत असलेल्या व्यक्ती, शाळाचालक, मुख्याध्यापक, शिक्षक, विद्यार्थीजन, पालकवर्ग, इतकेच नव्हे तर खासगी शिकवणीचे वर्गचालकही, ह्या सर्वांनी ह्याबाबत विचारांचे आदानप्रदान करावे अशी मराठी अभ्यास परिषदेने भूमिका घेऊन 'शालेय शिक्षण सेमी-इंग्लिश पद्धतीनुसार असावे काय?' ह्या विषयावर एका चर्चासत्राचे आयोजन केले. त्यानुसार डॉ० काळपांडे ह्यांच्याशीही सर्वप्रथम चर्चा करून त्यांनी ह्या चर्चासत्राद्वारे उपस्थित जनसमुदायासमोर प्रत्यक्ष बोलून आपली भूमिका सविस्तर सांगावी, लोकांच्या मनात असलेल्या शंका-समस्या दूर कराव्यात अशी त्यांना विनंती करण्यात आली. त्यांनी तत्परतेने त्या विनंतीला सकारात्मक प्रतिसाद देऊन आपले टिपणही पाठवून देत असल्याचे आम्हांला सांगितले. तथापि, नंतर काही काळाने त्यांनी आपला विचार बदलला आणि आम्ही चर्चासत्रात सहभागी होण्यासाठी विनंती केलेली सर्व मंडळी एकाच विचारधारेची व आपण मांडलेल्या भूमिकेच्या विरुद्ध मतप्रणाली असलेली असल्याने ही चर्चा एकांगी होणार आहे आणि म्हणूनच आपण ह्या चर्चासत्रात सहभागी होण्यास असमर्थ असल्याचे ठामपणे सांगणारे पत्र पाठवले.

त्याला उत्तर देताना आम्ही ही गोष्ट त्यांना स्पष्ट केली की मराठी अभ्यास परिषदेला कोणत्याही बाजूला झुकून लोकमतावर प्रभाव पाडण्याचा मुळीच हेतू नाही. आणि म्हणूनच जसे डॉ० काळपांडे ह्यांना ह्या चर्चासत्रात सहभागी होण्यासाठी निमंत्रण दिले आहे तसेच म०ए० सोसायटीचे शाळाचालक, मुख्याध्यापक व इतर अध्यापक,

रेणुकास्वरूप मुलींची शाळा, पुणे येथून सेमी-इंग्लिश पद्धतीने दिले जाणारे शालेय शिक्षण पूर्ण करून सध्या महाविद्यालयीन शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थिनी, मराठी माध्यमातून शिक्षण दिले जावे असे मत असलेले प्रा० मनोहर राईलकर, व०सी० देशपांडे, डॉ० शीला कोलटकर, डॉ० सुमन करंदीकर, मराठी व इंग्रजी अशा दोन्ही भाषांचे शिक्षण देण्यासाठी 'ब्रिजवर्क' ह्या अभिनव संकल्पनेचा पुरस्कार करून शालेय शिक्षण देणाऱ्या पुण्यातील 'अक्षरनंदन' ह्या प्रयोगशील शाळेचे चालक, डोंबिवलीचे श्री० उन्मेष इनामदार ह्यांच्यासारखे एकदोन पालक, सेमी-इंग्लिश पद्धती अनुसरली जाण्याची अनिवार्यता पटवून देणाऱ्या श्रीमती धनवंती हर्डीकर व बालभारतीच्या संशोधन विभागातील हिंदी व उर्दू भाषांसंबंधीचे कार्य करणारे काहीजण अशा शिक्षणक्षेत्रात तसेच इतर क्षेत्रांत आस्थेने, कळकळीने कार्य करीत असलेल्या सुजाण व्यक्ती, ह्यांनाही निमंत्रण दिले आहे, ही वस्तुस्थितीही नजरेस आणली. वर्तमानपत्रांतून लेख व त्यांवर उलटसुलट प्रतिक्रिया प्रसिद्ध होत असतात. वृत्तपत्रांपेक्षाही प्रभावी असलेले माध्यम म्हणजे समोरासमोर चर्चाविनिमय घडून येणे हे असते. म्हणूनच अनुभवी विचारवंतांना, पालकांना, विद्यार्थीवर्गाला, शिक्षणविषयक उपक्रमांमध्ये रुची असणाऱ्या सर्वसामान्य लोकांना समोरासमोर चर्चा घडवून आणली तर उत्तम लोकप्रबोधन होईल अशा दृष्टीने मराठी अभ्यास परिषदेने प्रस्तुत चर्चासत्राचा कार्यक्रम आयोजित केला असल्याचे आम्ही डॉ० काळपांडे ह्यांना पटवून दिले. तरीही, दुर्दैवाने त्यांनी आमच्या चर्चासत्रात सहभागी न होण्याच्या आपल्या निर्णयाशी ठाम असल्याचे आम्हांला कळवले.

ह्या चर्चासत्रानंतर इतका काळ लोटून गेला असला, तरीदेखील शालेय शिक्षणाचे माध्यम मातृभाषा ठेवून काळाची गरज म्हणून विद्यार्थ्यांना इंग्लिश भाषेचे शिक्षणही दिले गेले पाहिजे ही शिक्षणक्षेत्रातील अनुभवी व अभ्यासू विचारवंतांची भूमिका योग्य, की शासनाने पुरस्कृत केलेली सेमी-इंग्लिश पद्धत योग्य व व्यवहार्य, हा मुद्दा अजूनही चर्चेत राहिलेला आहे. म्हणूनच ह्या महत्त्वाच्या विषयावरील विचारमंथन करणाऱ्या चर्चासत्रातील निबंधांचे संकलन करून ते संदर्भासाठी जतन केले जावे ह्या हेतूने 'भाषा आणि जीवन'चा हा शालेय शिक्षण-माध्यम विशेषांक सिद्ध करण्यात आला आहे. चर्चासत्राच्या संकल्पनेला प्रेरणा देणारा डॉ० काळपांडे ह्यांचा लेख आणि त्यावरील पहिली प्रतिक्रिया देणाऱ्या प्रा० वीणा सानेकर ह्यांचा लेख संदर्भासाठी प्रथम दिले आहेत.

■





अनुक्रमणिका

# सेमी-इंग्लिश': एक सुवर्णमध्य

वसंत काळपांडे

**इं**ग्रजी माध्यमाकडे असलेला पालकांचा ओढा लक्षात घेऊन जिल्हा परिषद प्राथमिक शाळांमध्ये इयत्ता पहिलीपासून 'सेमी-इंग्लिश' अभ्यासक्रम सुरू करण्याबाबत शासन सकारात्मक विचार करत असल्याची घोषणा महाराष्ट्राचे शालेय शिक्षणमंत्री राजेंद्र दर्डा यांनी २०१२च्या पावसाळी अधिवेशनात विधानसभेतील चर्चेत केली.

मराठी माध्यमाच्या शाळांची सातत्याने घटणारी विद्यार्थिसंख्या आणि त्या संदर्भात करावयाची उपाययोजना या विषयावर ही चर्चा होती.

आजकाल महाराष्ट्रात मराठी माध्यम मरणासन्न अवस्थेत आहे अशी चर्चा अनेक व्यासपीठांवरून सातत्याने सुरू असते. ही चर्चा कितपत वस्तुस्थितीवर आधारलेली आहे? राष्ट्रीय शैक्षणिक नियोजन व प्रशासन विश्वविद्यालयाने केलेल्या २०१०-११च्या सर्वेक्षणानुसार भारतात इयत्ता पहिली ते आठवीपर्यंत दोन कोटी (एकूण विद्यार्थि-संख्येच्या ११ टक्के) विद्यार्थी इंग्रजी माध्यमात शिकतात. २००३-०४पासून सात वर्षांत हे प्रमाण २७४ टक्क्यांनी वाढले. आज गोवा, दिल्ली व सर्व छोट्या राज्यांमध्ये ५०%पेक्षा जास्त विद्यार्थी इंग्रजी माध्यमात आहेत. पंजाब व हिमाचल प्रदेशात हे प्रमाण २० टक्क्यांपेक्षा जास्त, तर हरियाणात ११ टक्के आहे. इतर अप्रगत हिंदी भाषक राज्यांमध्ये मात्र ते ५ टक्क्यांपेक्षाही कमी आहे. गुजरातमध्ये इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्यांची संख्या वेगाने वाढते आहे. देशभरात इंग्रजी माध्यमाबाबत असणारे आकर्षण महाराष्ट्रातही आहे. पण महाराष्ट्रात मराठी माध्यमाची परिस्थिती वाटते तेवढी चिंताजनक नक्कीच नाही. या परिच्छेदात दिलेली विविध राज्यांमध्ये इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची टक्केवारी आणि महाराष्ट्र आणि दक्षिणेकडील मोठ्या राज्यांची पुढील पानावर दिलेल्या तक्त्यातील आकडेवारी या दृष्टीने पुरेशी बोलकी आहे.

या चारही किंवा इतर बहुतेक प्रगत राज्यांपेक्षा महाराष्ट्रात इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण कमी आहे. त्याचवेळी/महाराष्ट्रात प्रादेशिक भाषा (मराठी) माध्यमात शिकणाऱ्यांचे प्रमाणही या चार राज्यांच्या तुलनेत जास्त आहे. इतकेच नाही तर ते महाराष्ट्रातील मराठी भाषक लोकांच्या प्रमाणापेक्षाही जास्त आहे. याचाच अर्थ महाराष्ट्रात अनेक अमराठी पालक कोणतीही सक्ती नसताना त्यांच्या





अनुक्रमणिका

मुलांना स्वेच्छेने मराठी शाळांमध्ये पाठवतात. महाराष्ट्रात मराठी माध्यमाबद्दल प्रचलित असणाऱ्या समजुतीला तडा देणारे हे वास्तव आहे. दक्षिणेकडील या चारही राज्यांमध्ये इंग्रजी माध्यमात जाणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण जास्त आणि प्रादेशिक भाषेत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण कमी असूनही ती आपल्या भाषेबद्दलचा तीव्र अभिमान आणि प्रादेशिक भाषेतील दर्जेदार कलाकृती यांच्यासाठी ओळखली जातात. असे का? या बाबींचा राज्यातील विद्यार्थी कोणत्या माध्यमात शिकतात याच्याशी संबंध नसतो काय? यासाठी इतरच काही घटक कारणीभूत आहेत काय?

| राज्य | प्रादेशिक भाषाच मातृभाषा असलेले लोक (राज्याच्या एकूण लोकसंख्येशी शेकडा प्रमाण) | राज्यातील एकूण विद्यार्थी संख्येपैकी | |
|---|---|---|---|
| | | प्रादेशिक भाषेत शिकणारे (शेकडा प्रमाण) | इंग्रजी माध्यमाचे शेकडा प्रमाण |
| आंध्र प्रदेश | ८४ | ६९ | ३६ |
| कर्नाटक | ६६ | ६६ | १४ |
| केरळ | ९६ | ७१ | १९ |
| तामिळनाडू | ८९ | ६३ | ३६ |
| महाराष्ट्र | ६८ | ७६ | १४ |

महाराष्ट्रात शालेय स्तरावर भाषा माध्यमासाठी कोणताही कायदा नाही; तसा तो असूही शकत नाही. तामिळनाडूने २०००मध्ये शालेय स्तरावर मातृभाषा हेच शिक्षणाचे माध्यम असावे असा निर्णय केला होता. परंतु मद्रास उच्च न्यायालयाने तो घटनाबाह्य असल्याने रद्द ठरवला. 'फक्त मातृभाषेतूनच शिका' या शिक्षणतज्ज्ञांच्या संदेशावरही लोक (अनेकदा स्वतः हा संदेश देणारेसुद्धा) विश्वास ठेवत नाहीत. मग इतर प्रगत राज्यांच्या तुलनेत महाराष्ट्रात मराठी (प्रादेशिक भाषा) माध्यमाबाबत एवढी चांगली स्थिती कशामुळे आहे? यात महाराष्ट्राच्या उदार आणि लवचिक भाषाधोरणाची महत्त्वाची भूमिका आहे हे विसरून चालणार नाही. त्यामुळेच आज राज्यात मोठ्या प्रमाणावर मराठी मातृभाषा नसलेली मुलेही मराठी माध्यमात शिकत आहेत. याच लवचीक धोरणाचा भाग असलेल्या सेमी-इंग्लिशचाही त्यात अतिशय महत्त्वाचा वाटा आहे. महाराष्ट्रात सेमी-इंग्लिशची सोय नसती, तर आज इयत्ता पाचवीपासून सेमी-





अनुक्रमणिका

इंग्लिशमध्ये शिकणारे प्रत्येक इयत्तेतील दोन लाखांपेक्षा जास्त विद्यार्थी इंग्रजी माध्यमाकडे वळले असते. परिणामत: इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या टक्केवारीत ११ची भर पडून ती २५च्या वर गेली असती.

महाराष्ट्रात प्रचलित असलेली ही 'सेमी-इंग्लिश'पद्धत शिक्षणशास्त्रात द्विभाषा माध्यम म्हणून ओळखली जाते. विज्ञान आणि गणित हे विषय इंग्रजीतून, तर इतर विषय मातृभाषेतून शिकवले जातात. १९७२मध्ये महाराष्ट्राच्या सर्व विभागांत इंग्रजी हा विषय अनिवार्य झाल्यानंतर काही शाळांनी आठवीपासून सेमी-इंग्लिश सुरू केले. विदर्भात ते पूर्वीपासूनच होते. सेमी-इंग्लिशला मिळणारा वाढता प्रतिसाद लक्षात घेऊन शासनाने २००४पासून इयत्ता पाचवीपासून सेमी-इंग्लिश सुरू करण्यास मान्यता दिली. २००७मध्ये तत्कालीन शालेय शिक्षणमंत्री प्रा० वसंत पुरके यांनी इयत्ता पहिलीपासून सेमी-इंग्लिश सुरू करण्यास मान्यता दिली. 'पहिलीपासून सेमी-इंग्लिश'ला सुरुवातीला फार प्रतिसाद नव्हता. अंमलबजावणीसाठी शासनाने कोणताही सक्रिय कार्यक्रम राबवला नाही. तरीसुद्धा त्याचे महत्त्व लोकांना जाणवू लागले आणि त्याचा प्रसार वाढला. आता अनेक जिल्हा परिषदांनी, महानगरपालिकांनी आणि खासगी संस्थानी आपल्या काही शाळांमध्ये इयत्ता पहिलीपासून सेमी-इंग्लिश सुरू केले आहेत. यांपकी काही शाळा पहिलीपासून फक्त गणित इंग्ऱजीतून शिकवतात; विज्ञान तिसरी किंवा पाचवीपासून इंग्रजीतून शिकवायला सुरुवात करतात. ही संख्या ३०००च्या वर गेली आहे आणि वाढतेच आहे. जणू काही एखादी मूक क्रांतीच.

काहींना सेमी-इंग्लिश मराठी माध्यमाला मारक आणि शैक्षणिक तत्त्वांना सोडून आहे असे वाटते. खरे म्हणजे 'सेमी-इंग्लिश' शाळेचे मूळ माध्यम मातृभाषा हेच राहते. सेमी-इंग्लिशमध्ये शिकणाऱ्या मुलांना मातृभाषेतून शिकण्याचे सर्व फायदे तर मिळतातच, पण इंग्रजीतील ज्ञानाची दालनेही त्यांच्यासाठी सहजतेने खुली होतात. २००५च्या राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखड्यात बहुभाषिकत्वाचे महत्त्व अधोरेखित केले आहे. बहुभाषिकत्व म्हणजे एकापेक्षा अधिक भाषांवर प्रभुत्व असणे. हे प्रभुत्व वेगवेगळ्या भाषांच्या बाबतीत वेगवेगळया पातळ्यांवर असू शकते. बोधात्मक विकास, सामाजिक सहिष्णुता, अनेकांगी विचार करण्याची क्षमता आणि अध्ययनात वरच्या दर्जाची संपादणूक हे बहुभाषिकत्वाचे काही महत्त्वाचे फायदे आहेत. बहुभाषिकत्वाचा अर्थ एकापेक्षा अधिक भाषा शिकणे एवढ्यापुरताच मर्यादित नाही. त्यांचा व्यवहारात, ज्ञानार्जनात उपयोग करणेही तेवढेच महत्त्वाचे आहे. सेमी-इंग्लिश हा त्यासाठी उत्तम मार्ग आहे. राज्याच्या २०१० अभ्यासक्रम आराखड्यातील शिफारशीनुसार इंग्रजी

माध्यमातही सामाजिक शास्त्र, कला असे विषय मराठीतून शिकण्याची सोय विद्यार्थ्यांच्या हिताची ठरेल.

भारतात पहिलीपासून सेमी-इंग्लिश कुठे यशस्वीपणे सुरू आहे असा प्रश्न अनेक जण विचारतात. देशभरच्या १०८५ केंद्रीय विद्यालयांत गणित आणि विज्ञान हे विषय पहिलीपासूनच इंग्रजीतून शिकवले जातात; तर इतर सर्व विषय हिंदीतून. या शाळांत प्रामुख्याने मध्यम किंवा कनिष्ठ मध्यम वर्गातील केंद्र शासनाच्या सेवेत असणाऱ्या तृतीय आणि चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांची मुले शिकतात. अनेक विद्यार्थ्यांची मातृभाषा हिंदी किंवा इंग्रजी यांपकी कोणतीच नसते. तरीसुद्धा केंद्रीय विद्यालये त्यांच्या उत्कृष्ट दर्जासाठी प्रसिद्ध आहेत. हा अनुभव लक्षात घेऊन दिल्ली आणि दिल्लीजवळच्या हिंदी भाषक राज्यांतील हिंदी माध्यमाच्या काही शाळा गेल्या अनेक वर्षांपासून इयत्ता पहिली, सहावी किंवा नववीपासून विज्ञान व गणित हे विषय इंग्रजी माध्यमात शिकवत आहेत. सेमी-इंग्लिशमुळे विद्यार्थ्यांचे विज्ञान आणि गणिताचे संबोध कच्चे राहतात, त्यांना धड इंग्रजीही येत नाही किंवा मराठीही येत नाही ह्या काही चुकीच्या समजुती आहेत. प्रत्यक्षात वस्तुस्थिती तशी नाही. विज्ञान किंवा गणित शिकवताना काही शिक्षक मराठीचा वापर करतात अशीही एक तक्रार असते. त्यात काहीही चूक नाही. उलटपक्षी, ज्यांना बहुभाषिकत्वाचा खरा अर्थ कळला नसतो असे शिक्षकच शिकवताना केवळ इंग्रजीचाच वापर करतात. मुलांच्या घरच्या भाषेचा उपयोग शिक्षकांनी अध्यापन करताना करावा अशी अपेक्षा अभ्यासक्रम आराखड्यात व्यक्त केली आहे. इंग्रजीमधून एखादा विषय शिकवताना तर या बाबीची विशेषच काळजी घ्यावी लागते. मुलांच्या मातृभाषेचा अध्यापनाच्या सुरुवातीच्या टप्प्यावर वापर केला, तर मुलांना शिकवलेले समजणे सोपे जाते आणि त्यांना शाळेत परक्यासारखे वाटत नाही. मातृभाषेचा वापर दुसरी भाषा शिकताना अडथळा ठरत नाही, तर त्यामुळे दोन्ही भाषांबाबतची समज वाढण्यात मदतच होते.

महाराष्ट्रातील इंग्रजी माध्यमाचे आकर्षण आणखी कमी करण्यासाठी दोन उपाय योजता येतील. एक म्हणजे मराठी माध्यमाच्या शाळांमध्ये इयत्ता सहावीपासूनच संस्कृत किंवा इतर अभिजात भाषा, परकीय भाषा किंवा एखादी आधुनिक भारतीय भाषा (विशेषत: अमराठी मुलांसाठी त्यांची मातृभाषा) ऐच्छिक रूपात शिकण्याची सोय उपलब्ध करून भाषाविषयक धोरणाची लवचीकता आणखी वाढवावी. दुसरा उपाय म्हणजे मागणी आहे आणि शक्य आहे तिथे तिथे आठवीपासून, पाचवीपासून किंवा पहिलीपासून 'सेमी-इंग्लिश' सुरू करावे. आपल्या मुलांसाठी भाषामाध्यमाची निवड





अनुक्रमणिका

करताना मातृभाषेबद्दलच्या भावना आणि इंग्रजीची व्यवहारातील उपयोगिता यांच्यात होणाऱ्या संघर्षांत बहुतेकदा व्यवहाराचा विजय होतो. 'सेमी-इंग्लिश'चा पर्याय भावना आणि व्यवहार या दोन्हींना सांधणारा सुवर्णमध्य आहे. त्यात हे द्वैत नष्ट होऊन कोणताच संघर्ष उरत नाही.

■

(दै० लोकसत्ता, दि० १० ऑगस्ट २०१२मध्ये प्रसिद्ध झालेला लेख)

**गांधीजी आणि भाषा**

माझी अशी खात्री आहे की ज्या राष्ट्रातील मुलांना स्वतःच्या भाषेव्यतिरिक्त इतर भाषेतून शिक्षण घ्यावं लागतं, ते राष्ट्र आत्मघातच करत असतं. ते त्यांचा जन्मसिद्ध हक्कच हिरावून घेत असतं. परकीय माध्यम हे आमच्या तरुणांवर अनावश्यक ताण आहे. ते त्यांचं बुद्धिस्वातंत्र्यच हिरावून घेत असतं. ते त्यांची वाढ खुंटवतं. आणि त्यांना आपल्या कुटुंबापासून दूर नेतं. ही गोष्ट म्हणजे पहिल्या प्रतीची राष्ट्रीय शोकांतिका होय, असं मी मानतो. परकीय माध्यमामुळे आमच्या मुलांना बुद्धिमांद्य येत असून त्यांच्या ज्ञानतंतूंवर अनावश्यक ताण आणतं. त्यानं त्यांना घोक्ये आणि केवळ नकलाकार बनवलं असून मौलिक कार्य व विचार ह्या दृष्टीनं निरुपयोगी बनवलं आहे. तसंच त्यांच्या ज्ञानाचा आपापल्या कुटुंबाला व समाजाला उपयोग होण्याच्या दृष्टीनं त्यांना दुबळं केलं आहे. परकीय माध्यमानं आपल्या मुलांना आपल्या देशातच परकीय बनवलं आहे. सध्याच्या शिक्षणपद्धतीची ही सर्वांत मोठी शोकांतिका होय. परकीय माध्यमानं देशी भाषांची वाढ थांबवली आहे. माझ्या हाती जर हुकूमशहाची सत्ता असती तर आपल्या मुलांचं व मुलींचं परकीय माध्यमातून होणारं शिक्षण मी आजच्या आज थांबवलं असतं. आणि हा बदल तत्काळ अमलात आणला नाही तर शिक्षकांना व प्राध्यापकांना ताबडतोब नोकरीतून काढून टाकलं असतं. पाठ्यपुस्तकं तयार होईतोसुद्धा मी थांबलो नसतो. बदल झाला की पाठ्यपुस्तकं तयार होऊ लागतील. हा रोग असा आहे की त्यावर तत्काळ इलाज करायला हवा.

'यंग इंडिया', दि० १ सप्टेंबर, १९२१



अनुक्रमणिका

# सेमी- इंग्रजी' माध्यम - सुवर्णमध्य की सुवर्णमृग?

**वीणा सानेकर**

महाराष्ट्र राज्य माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाचे माजी अध्यक्ष वसंत काळपांडे यांचा 'सेमी इंग्लिश : एक सुवर्णमध्य' हा लेख मनाला अशांत करून गेला. मात्र मराठी शाळा आणि सेमी इंग्रजी या विषयाची चर्चा या निमित्ताने ऐरणीवर आली हे बरे झाले.

महाराष्ट्राव्यतिरिक्त अन्य चार राज्यांची आकडेवारी देऊन महाराष्ट्रात मराठी शाळांची स्थिती चिंताजनक नसल्याचे काळपांडे यांनी या लेखात नोंदवले आहे. या लेखात महाराष्ट्रातील मराठी शाळांमध्ये शिकणाऱ्या मुलांमध्ये आजमितीला अभिजन-वर्गातील किती टक्के? बहुजन समाजातील किती? महानगरातील किती टक्के? ग्रामीण भागातील किती टक्के? गेल्या काही वर्षांत या प्रमाणात काय बदल झाले? किंवा किती मराठी शाळांमधील तुकड्या कमी झाल्या? हे संदर्भ नाहीत. लेखात दिलेल्या तक्त्यातील आकडे फसवे चित्र निर्माण करणारे आहेत. 'प्रादेशिक भाषेत शिकणारे' असे म्हणून महाराष्ट्रात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचे जे प्रमाण हा तक्ता दाखवतो, त्यावरून प्रादेशिक म्हणजे मराठीच हा अर्थबोध होत नाही. त्यामुळे त्या प्रमाणात उर्दू, गुजराती इत्यादी भाषांमध्ये शिकणारे विद्यार्थीही समाविष्ट आहेत असे मानायला निश्चित जागा आहे.

मराठी शाळांविषयीच्या, स्वत:ला सोयीस्कर निष्कर्षांना पूरक आकडेवारीचे सप्रमाण एकांगी वास्तव उभे करायचे आणि त्या आकडेवारीचा सर्वांगीण अभ्यास न मांडता मराठी शाळांचे दिशाभूल करणारे चित्र समाजासमोर ठेवायचे हे अनुभव गेल्या काही दिवसांत वारंवार येत आहेत. काही दिवसांपूर्वी 'आयबीएन लोकमत'वरील 'आजचा सवाल'च्या चर्चेत आमदार भाई जगताप यांनी आक्रमकपणे सादर केलेल्या मराठी शाळांच्या आकडेवारीची इथे आठवण होते. इंग्रजी शाळांचे फुटलेले पेव आणि मराठी शाळांमधील विद्यार्थ्यांच्या वेगाने घसरत्या पटसंख्येच्या वस्तुस्थितीची तळमळीने चिंता करणाऱ्या माणसांची संख्या खरोखरच कमी आहे. तिच्याकडे निर्देश करण्याचा प्रयत्न केला की तो हाणून पाडणारी आणि मराठी शाळांचे सर्व काही आलबेल असणारे चित्र उभे करण्याचा नवाच डाव सध्या महाराष्ट्रात रंगतो आहे. या डावाला शिक्षणक्षेत्रातील धुरीणही बळी पडू लागले की मन अस्वस्थ होते.





अनुक्रमणिका

वसंत काळपांडे यांच्या उपरोक्त लेखात इतर राज्यांच्या तुलनेने महाराष्ट्रात मराठी माध्यमाची स्थिती चांगली असल्याचा शोध लागल्याचा आनंद जागोजागी विखुरला आहे. त्यामुळेच त्यांना स्वेच्छेने मराठी शाळांमध्ये आपल्या मुलांना पाठवणारे अनेक अमराठी पालक दिसतात. (प्रत्यक्षात असे पालक किती?) महाराष्ट्रात मराठी माध्यमाचे आशादायी चित्र दिसण्याचा हा आनंद इतका मोठा आहे की, त्या आनंदात एक विधान काळपांडे अत्यंत घाईने करतात. ते म्हणतात, 'फक्त मातृभाषेतून शिका, या शिक्षणतज्ज्ञांच्या संदेशावरही लोक (अनेकदा स्वत हा संदेश देणारेसुद्धा) विश्वास ठेवत नाहीत.' हे विधान त्यांनी नेमके कोणत्या शिक्षणतज्ज्ञांबाबत केले आहे हे स्पष्ट नसल्याने मातृभाषेतून शिक्षणाचा नैतिक आग्रह ज्यांनी ज्यांनी धरला त्या सर्वांचाच अप्रत्यक्षपणे अवमान करते.

महात्मा गांधी, लोकमान्य टिळक, रवींद्रनाथ टागोर, आचार्य विनोबा भावे, ताराबाई मोडक इत्यादी मातृभाषेतील शिक्षणाचे सामर्थ्य ज्ञात असणाऱ्या आणि सर्व सामर्थ्यानिशी ते व्यक्त करणाऱ्या शिक्षणतज्ज्ञ आणि विचारवंताची प्रदीर्घ परंपरा हे या देशाचे मौलिक संचित आहे. मात्र ते आपल्या शिक्षणविषयक भाषाधोरणात नेहमीच दुर्लक्षित राहिले. याची विस्तृत चर्चा आजमितीला अपरिहार्यच आहे; पण तूर्तास ती टाळून काळपांडे यांच्या उपरोक्त लेखाच्या केंद्रस्थानी असलेल्या 'सेमी इंग्रजी' च्या मुद्यांकडे वळणे औचित्यपूर्ण होईल. त्यांच्या मते सेमी इंग्रजीचा पर्याय स्वीकारणाऱ्या मराठी शाळांच्या संख्येत वाढती भर ही जणू काही एक मूक क्रांतीच. त्यांच्या या संदर्भातील मांडणीआधारे खालील प्रश्न अधोरेखित करावेसे वाटतात.

१. इंग्रजीतील ज्ञानाची दालने मराठी शाळांमधील मुलांसाठी खुली होण्याचा सेमी-इंग्रजी हा एकमेव मार्ग आहे काय?

२. 'सेमी-इंग्लिश' ही महाराष्ट्रातील प्रचलित पद्धत म्हणजे विज्ञान आणि गणित हे विषय विद्यार्थ्यांनी इंग्रजीतून शिकणे. विद्यार्थ्यांचे इंग्रजी सक्षम होण्यासाठी याच विषयांची निवड का? सर्वच मराठी शाळांमधले विद्यार्थी पुढे विज्ञान, इंजिनीअरिंग वा वैद्यक क्षेत्राकडे वळणार आहेत काय? मग दहावीनंतर खुल्या झालेल्या नानाविध क्षेत्राची आणि वाटांची ओळख करून देण्याचे प्रयत्न वाढवण्याऐवजी 'सेमी-इंग्रजी' माध्यमातून विज्ञान-गणितावर प्रभुत्व मिळवाल तर करिअर विश्वात ताराल, ही मानसिकता मुलांच्या मनात रुजवण्यात पुढाकार घेणे म्हणजे विद्यार्थ्यांच्या भिन्न भिन्न क्षमतांचा संकोच करणे नव्हे काय?

३. आठवीपासून सेमी इंग्रजीकडे वळणाऱ्या मराठी शाळा आज पाचवी, तिसरी या क्रमाने थेट पहिलीपर्यंत येऊन पोहोचल्या आणि आता तर अनेक शाळांनी





अनुक्रमणिका

मराठीतून गणित आणि विज्ञान लिहिण्याचा पर्यायच बंद करून हे दोन विषय इंग्रजीतून लिहिण्याचे धोरण मुलांवर लादले आहे. वास्तविक ज्यांना हे दोन विषय इंग्रजीतून लिहिणे जमत नसेल किंवा आवडत नसेल त्यांनी ती शाळाच सोडावी असेच हे धोरण सुचवते. मातृभाषेतून अभिव्यक्ती करण्याच्या मुलांच्या शिक्षणाच्या मूलभूत हक्कावरच गदा आणणारे हे धोरण नव्हे काय?

४. थोडक्यात मराठी शाळाची सेमी-इंग्रजीच्या दिशेने ज्या वेगाने घोडदौड सुरू आहे, त्या प्रवासातले धोके आज नजरेआड करून चालणार नाहीत. महाराष्ट्रातील बहुसंख्य मराठी शाळांनी स्वत:चे अस्तित्व टिकवण्याचा, स्वत:ला वाचवण्याचा एक पर्याय म्हणून 'सेमी-इंग्रजी'ची निवड केली हे सत्य नाकारता येणार नाही. मुंबईसारख्या महानगरात प्रथितयश व मोठ्या शाळांनी सरसकट सर्वच विद्यार्थ्यांसाठी पहिलीपासून सेमी-इंग्रजीचे धोरण अवलंबल्याचे चित्र दिसते. छोट्या शाळांनी त्यांचे अनुकरण करण्यास सुरुवात केली आहे. ज्या वेगाने हे घडते आहे, त्या प्रक्रियेत भविष्यात इंग्रजी वा सेमी-इंग्रजी अशाच शाळा इथे दिसतील. 'मराठी शाळा'नामक शाळा या साऱ्यात शोधूनही सापडू नये, अशीच परिस्थिती आहे. सेमी-इंग्रजीबरोबरच मराठीतून विज्ञान-गणित अभ्यासण्याचा पर्याय मुलांकरता खुला ठेवण्याचा विवेक दाखवणाऱ्या शाळा दिवसेंदिवस कमी होत जाणे हे विद्यार्थ्यांच्या हिताचे नाही आणि ते शैक्षणिक तत्त्वांच्याही विरोधीच आहे. 'इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये शिकणारी लहान मुले विज्ञान आणि सामाजिक शास्त्रे अजिबात न समजून घेता पाठांतर करतात, हे आपण जाणतोच. जी गोष्ट समजून न घेता पाठ केली जाते तिचे मुलाच्या मनावर ओझे होते हे शिक्षणशास्त्रातील सर्वज्ञात तत्त्व आहे,' असे अवलोकन केंद्र शासनाने नेमलेल्या यशपाल समितीच्या अहवालात नोंदवले आहे. ते इंग्रजी माध्यमाबाबत असले तरी शिक्षण हे मुलांच्या मनावरचे ओझे होऊ नये, या दृष्टीने मराठी शाळांनी 'सेमी-इंग्रजी'चे धोरण स्वीकारताना त्याचा विचार अत्यंत डोळसपणे केला पाहिजे. स्वत:ला तारणारे सुकाणू म्हणून 'सेमी-इंग्रजी'चा विचार करताना विद्यार्थ्यांचे हित डावलून चालणार नाही. विद्यार्थ्यांचे हित असे म्हणताना सर्व विद्यार्थी इथे अभिप्रेत आहेत. इंग्रजीत गणित आणि विज्ञानाशी जुळवून न घेता आल्याने काही विद्यार्थ्यांच्या मनात जर न्यूनगंड निर्माण होणार असेल तर हे धोरण अन्यायकारक ठरेल. म्हणूनच 'सेमी-इंग्रजी' राबवताना त्याच्याशी

निगडित सर्वच पैलूंचा समग्र विचार आवश्यक ठरतो आणि यात मानसशास्त्रीय पैलूही आहेत. गणिताविषयीचे दडपण संकल्पनांचे आकलन होण्यासाठी मातृभाषेव्यतिरिक्त चांगला पर्याय नाही हे विज्ञानाचे अभ्यासक मान्य करतात. सापेक्षता सिद्धान्त मांडणारा अल्बर्ट आइन्स्टाइन किंवा अणूपेक्षाही लहान कणाचे अस्तित्व प्रस्थापित करण्यासंबंधी शोध लावून नोबेल मिळवणारा जपानी वैज्ञानिक डॉ० हिकेडी युकावा या दोघांनी त्यांचे संशोधन करताना इंग्रजीचा अट्टहास धरला नाही.

मराठी शाळांमधील विद्यार्थ्यांचे इंग्रजी सक्षमीकरण हा मुळात मूलभूत मुद्दा. त्यासाठी इंग्रजीकडे जाणीवपूर्वक लक्ष द्यायचे की विज्ञान-गणित हे विषय इंग्रजीतून शिकले-शिकवले गेले की मराठी शाळांतील मुलांच्या इंग्रजीचा प्रश्न सुटेल अशी स्वत:ची समजूत करून घ्यायची? इंग्रजीची व्यवहारातील उपयोगिता ओळखून इंग्रजी संभाषणकौशल्य-लेखनकौशल्य यासाठी मराठी शाळा नेमके कोणते उपक्रम राबवत आहेत, याचा आढावा पहिलीपासून मराठी शाळांमध्ये इंग्रजी सुरू झाल्याला १२ वर्षे झाल्याच्या टप्प्यावर तरी मराठी शाळांनी घ्यायला हवा आहे.

दुसऱ्या बाजूने गणित आणि विज्ञान या दोन विषयांच्या दृष्टीनेही हे लक्षात घेतले पाहिजे की, मराठी शाळांमध्ये विज्ञानाबरोबरच गणिताच्या प्रयोगशाळाही निर्माण व्हायला हव्या आहेत. प्रयोगशाळांमधील साधने काचेच्या कपाटात पडून न राहता ती मुलांच्या हाती यायला हवी आहेत. गेली अनेक वर्षे विज्ञानाच्या क्षेत्रात भरीव काम करणाऱ्या मराठी विज्ञान परिषदेच्या उपक्रमांचा फायदा किती मराठी शाळांनी करून घेतला आहे? विज्ञान परिषदेसारख्या संस्था आणि मराठी शाळा यांच्यात पूल जोडले जायला हवे आहेत. त्यांचे जाळे विस्तारायला हवे आहे. मराठी शाळांच्या सेमी-इंग्रजीकरणाने इंग्रजीच्या अथवा विज्ञान-गणिताच्या अध्ययन-अध्ययनाचे वर्षानुवर्षांचे तिढे सुटणार आहेत काय? ते सोडवायचे आणि त्याचबरोबर इंग्रजी शाळांच्या स्पर्धेला तोंड द्यायचे तर मराठी शाळांनी काय तयारी केली पाहिजे, हा विचार विवेकीपणाने करणे हाच आज शहाणपणा ठरेल. मात्र त्यासाठी सेमी-इंग्रजीच्या सुवर्णमृगाप्रमाणे झापडे लावून धावणे थांबवले पाहिजे. आणि हो, जाता-जाता काळपांडे यांना माझी विनंती आहे की ज्या बहुभाषिकत्वाच्या मुद्याचा आधार घेऊन ते सेमी-इंग्रजीची पाठराखण करीत आहेत त्याच आधारावर त्यांनी लवकरच इंग्रजी शाळांच्या सेमी-मराठीकरणाची आकडेवारीही जाहीर करावी. महाराष्ट्रात सेमी-इंग्रजीचे धोरण स्वीकारलेल्या

३०००पेक्षा जास्त मराठी शाळा आहेत असे आकडे ते नोंदवतात. महाराष्ट्रात सेमी-मराठीचे धोरण स्वीकारलेल्या इंग्रजी शाळादेखील काळपांडे यांना लवकरच सापडोत अशा शुभेच्छा !



(दै० लोकसत्ता, दि० १७ ऑगस्ट २०१२मध्ये प्रसिद्ध झालेला लेख)

देशभाषांचा अभ्यास नीट न झाल्यामुळे आमच्या मुलांस देशभाषांत लिहिलेले तंतोतंत कळत नाही; आणि त्यामुळे त्यांना खऱ्या आणि शांत बुद्धीने लिहिलेल्या लेखनापेक्षा खोडसाळ लेखच बरे वाटतात. त्यांची अभिरुची व्हावी तितकी संस्कृत होत नाही. परंतु ही हानी एवढी मोठी म्हणता येत नाही. आज आमच्या मुलांच्या वयातील बहुतेक उत्तम काळ शब्दग्रहणाच्या मृगजळाच्या पाठलागात जातो, या हानीएवढी दुसरी हानीच नाही. मुलांच्या अंगात जोम आहे, हिंमत आहे तोवर त्यांना रोज नवनवे चमत्कार दिसले आणि त्यांचे अवलोकन करून त्यातील ज्ञानाचा शोध लावण्यात आणि ते आपलेसे करण्यात त्यांच्या नैसर्गिक जिज्ञासेला आणि ग्राहकतेला शिक्षण मिळाले म्हणजे त्यास मिळालेला प्रत्येक ज्ञानकण रुजत घातलेल्या बीजासारखा मूळ धरतो आणि त्याचा फलभार कालांतराने फार मोठा होतो. खरे ज्ञान नुसते पडून राहावयाचे नाही. ते मनःसृष्टीत चळवळ उत्पन्न करते. त्यातील किल्मिष काढून टाकून ते नवीनाशी मिळून मिसळून जाण्यास योग्य बनविते. असले जिवंत ज्ञान विपुलप्रसव आणि प्रभावशाली व्हावयाचेच.

– वासुदेव बळवंत पटवर्धन

('शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम'मधून)





अनुक्रमणिका

# सेमी-इंग्लिश – क्रांतिकारक शोध?

उन्मेष इनामदार

**१.** सेमी-इंग्रजी हा मोठा क्रांतिकारक शोध वगैरे असल्याचा आव आणला जातो आहे. मग झाशीची राणी लक्ष्मी, तात्या टोपे यांचे कौतुक कशासाठी करायचे? इंग्रजांपुढे शरणागती पत्करणाऱ्यांना खरे क्रांतिकारक म्हणावयास हवे. सेमी-इंग्रजी माध्यमाला क्रांतिकारक शोध म्हणणाऱ्यांनी या आपल्या दुतोंडीपणाचा खुलासा करायला हवा.

२. मराठी माध्यमाच्या विद्यार्थ्यांना इयत्ता ११वीमध्ये इंग्रजी माध्यमातून शिकावे लागते व त्यावेळी इंग्रजी फारशी येत नसते, या समस्येवर उपाय म्हणून सेमी-इंग्रजी माध्यम या कल्पनेचा जन्म झाला आहे. परंतु हा उपाय पूर्णपणे चुकीचा आहे. खरा उपाय हा आहे की महाविद्यालयीन शिक्षण पूर्णपणे मातृभाषेच्या माध्यमातून करणे.

स्वातंत्र्यानंतर भारताची राज्यघटना तयार करण्यात आली. त्यात याबाबत असे नमूद केलेले आहे की भारतीय संघराज्यातील सर्व घटक राज्ये आपापल्या राज्यातील जनतेला त्यांच्या मातृभाषेतून किंवा राज्याच्या राजभाषेतून शालेय व कोणत्याही स्तरावरील महाविद्यालयीन शिक्षण उपलब्ध करून देतील. घटनेतील या कलमामुळेच भारतीय स्वातंत्र्य व प्रजासत्ताक यांना काही अर्थ प्राप्त होऊन ही राज्यघटना स्वीकारार्ह ठरली होती व आहे. वरील कामासाठी ज्या साधनसुविधा, शिक्षण साहित्य, प्रशिक्षण आदि गरजा असतील त्यांची पूर्तता करण्यासाठी १५ वर्षांचा कालावधी देण्यात आला होता. या कालावधीत इयत्ता पहिलीपासून टप्प्याटप्प्याने सर्व शिक्षणाचे १५ वर्षांत म्हणजेच १९६६ सालापर्यंत मातृभाषीकरण पूर्ण व्हावयास हवे होते. प्रत्यक्षात राज्यकर्त्यांनी कोलांटी उडी मारून उलट दिशेने वाटचाल करणे ही घटनेची पायमल्ली तर आहेच पण तमाम भारतीय जनतेचा विश्वासघात व जगाची फसवणूक आहे.

३. सन १९७३ साली महाराष्ट्र शासनाने असा निर्णय घेतला की यापुढे एकाही इंग्रजी माध्यमाच्या शाळेला सरकारी अनुदान द्यावयाचे नाही. जनतेचा पैसा इंग्रजी माध्यमाच्या शिक्षणावर खर्च करायचा नाही; आणि इतकी वर्षे तो कसोशीने पाळला. परंतु आता आडमार्गाने सेमी-इंग्रजी माध्यमाद्वारे हा निर्णय फिरवला जातो आहे याकडे कोणाचेही लक्ष नाही. त्या निर्णयानुसार आता सेमी-इंग्रजी माध्यमात शिकवणाऱ्या शाळांचे अनुदान निम्मे करणार का? याशिवाय सेमी-इंग्रजी माध्यमाची पुढची पायरी पूर्ण इंग्रजी माध्यम असणार नाही याची शाश्वती काय? तसे झाल्यास संबंधित शाळांचे अनुदान बंद करणार



अनुक्रमणिका

का? तशी त्या शाळांची तयारी आहे का? याबाबात कोणता विचार सरकारने व संबंधित शाळांनी केला आहे?

४. जगात सर्वत्र मातृभाषा हा आपल्या अस्मितेचे व राष्ट्रवादाचे, एकजिनसी व एकसंध समाजाचे, राष्ट्रीय चारित्र्याचे व शिस्तीचे एक लक्षण मानले जाते. जसे राष्ट्रध्वज, राष्ट्रगीत, देशाचे चलन इ० त्यानुसार शिक्षणाचे माध्यम हे कधीही मातृभाषाच असते. सेमी-इंग्रजी याचा अर्थ मातृभाषेला सेमी-तिलांजली. यातून कोणता संदेश राज्यकर्ते जनतेला देत आहेत? हाच ना, की शिक्षणाचे मातृभाषा हे माध्यम बुडणाऱ्या नौकेसारखे आहे. तुम्ही त्यात मुलांना घालून चूक केलेली आहे. तेव्हा पुढच्या पिढीत मातृभाषेला पूर्ण तिलांजली द्या.

सेमी-इंग्रजी हा गोंडस नावाखाली मराठी माध्यमातल्या सधन पालकांना नफेखोरी तत्त्वावर चालणाऱ्या इंग्रजी माध्यमाकडे वळवण्याचा चोरमार्ग आहे. त्यातून काळा पैसा निर्माण करणे हा त्यामागचा उद्देश आहे.

मातृभाषेतून जनतेला शिक्षण देणे व मातृभाषेला/राजभाषेला आपल्या राज्यात सर्वोच्च प्रतिष्ठा व सन्मान देणे हे राज्यकर्त्यांचे कर्तव्य आहे. ते जमत नसेल तर खुर्च्या सोडणे हा घटनात्मक उपाय आहे. सेमी-इंग्रजी हा नव्हे. अन्यथा याच धर्तीवर सेमी-तिरंगा, सेमी-राष्ट्रगीत, सेमी-डॉलर असे तोडगे अज्ञानी लोकांच्या इच्छेखातर काढणार का?

५. भारताच्या प्रत्येक नागरिकाला संधींची समानता, सन्मानाने व प्रतिष्ठेने जगण्याचा हक्क संविधानाने दिलेला आहे. त्याचीही पायमल्ली इंग्रजी व सेमी-इंग्रजी माध्यमाच्या शिक्षणाने होते आहे. वरील हक्क प्रत्येकाला मिळण्यासाठी सर्व बालकांना समान शिक्षण मिळणे आवश्यक आहे. २००९च्या शिक्षण हक्क कायद्यातही याचा अंतर्भाव आहे. शिक्षणाच्या माध्यमाच्या निकषावर भारतीय बालकांमध्ये भेदभाव निर्माण करणे हा भयानक नवा जातीयवाद आहे. एव्हढेच नव्हे तर माझा असा गंभीर आरोप आहे की भारतीय जनतेत धर्म व जात या निकषांवर तेढ असल्याचा आभास निर्माण करायचा व त्या पांघरुणाखाली सांपत्तिक स्थिती, शिक्षण व संस्कृती या निकषावर निर्माण केलेली नवी जातीयता लपवायची असा हा राज्यकर्त्यांचा कट आहे. जनतेतील अज्ञान, असंघटितता कायम राहावी व तिची आर्थिक लुबाडणूक करता यावी हा या कटामागचा उद्देश आहे. इंग्रजी/सेमी-इंग्रजी माध्यम हा त्या कटाचाच एक भाग आहे. पारतंत्र्य काळातील ब्रिटिशांच्या फोडा व झोडा या नीतीहून भयंकर असा हा प्रकार आहे.

भारताच्या प्रत्येक नागरिकाला संधींची समानता आणि सन्मानाने व प्रतिष्ठेने जगण्याच्या घटनादत्त हक्काचा आदर प्रामाणिकपणे करायचा असेल तर त्यासाठी प्रत्येकाला त्याच्या मातृभाषेतून शिक्षण घेण्याचा पर्याय उपलब्ध असणे पुरेसे नसून फसवणूक आहे; तर भारतीय भूमीवर मातृभाषेच्या माध्यमाला इंग्रजीसारख्या परभाषेच्या माध्यमाचा पर्याय कोणालाही उपलब्ध नसणे त्यासाठी आवश्यक आहे. तो उपलब्ध नसल्यावर सेमी-इंग्रजी सारख्या चोरमार्गांचे प्रयोजनच राहात नाही.

६. आज जगभर शिक्षण हे आधुनिक शिक्षणशास्त्रानुसार चालते. भारतीय जनतेसाठी शिक्षणाचे माध्यम हे इंग्रजी/सेमी-इंग्रजी असणे याला कोणताही शिक्षणशास्त्रीय आधार नाही; किंबहुना हा प्रकार पूर्णपणे अशास्त्रीय व घातक आहे. कोणतीही भाषा शिकण्यास कोणाचाच विरोध असण्याचे काहीच कारण नाही; परंतु इंग्रजी शिकणे व इंग्रजीतून शिकणे यात लोकांच्या अज्ञानाचा गैरफायदा घेऊन गल्लत केली जाते आहे. इंग्रजी भाषेचा अभ्यास भारतीयांनी जरूर करावा व त्या भाषेत भारतीयांनी जरूर पारंगत व्हावे. परंतु याचा अर्थ असा कधीही होत नाही की इंग्रजी ही भारतीयांसाठी शिक्षणाचे माध्यम म्हणून उपयुक्त आहे.

तसे जर असते तर इंग्रजांनी या देशावर केलेल्या राज्याचा काळ १५० वर्षे अधिक भारतीयांच्या स्वातंत्र्योत्तर भाषिक गुलामगिरीची ६५ वर्षे अशा २१५ वर्षांच्या प्रदीर्घ काळात इंग्रजी हीच इथल्या प्रत्येकाच्या जिभेवर रुळायला हवी होती. इथल्या मुलामुलांत रांगायला व दरीदरीत हिंडायला हवी होती. इंग्रजी भाषा हे भारतात एकात्मता व बंधुभाव यांचे साधन व्हायला हवे होते. परंतु वास्तव हे आहे की पारतंत्र्याच्या काळातच भारतीय भाषांचा मोठ्या प्रमाणावर विकास झाला. उत्तमोत्तम साहित्य निर्माण झाले. आज इंग्रजी भाषा हा भारतीय समाज दुभंग होण्याचा निकष ठरला आहे. हाच पुरावा आहे इंग्रजी ही भारतात शिक्षणाचे माध्यम म्हणून कधीही यशस्वी होणे शक्य नाही याचा. राज्यकर्ते व राजकारणी यांच्यासाठी ती कितीही लाभदायक व सोयीची असली तरीही. राज्यकर्ते ती जेव्हढी लादत राहातील तेव्हढ्या शैक्षणिक, सामाजिक व आर्थिक समस्या यादेशात निर्माण होत राहातील. आजवर हेच दिसून आलेले आहे. आज आम्हां भारतीयांना इंग्रजी येते पण शेजारच्या राज्याची भाषा येत नाही या एकात्मतेच्या दृष्टीने लज्जास्पद स्थितीचे कारण राज्यकर्त्यांनी गुलामगिरीच्या मानसिकतेतून भारतीय भाषांपेक्षा इंग्रजी भाषेला अवास्तव महत्त्व दिले म्हणून.

७. आज भाषा, भाषांतर व लिपी याबाबात तंत्रज्ञान इतके प्रगत होत चालले आहे की व्यवहार्यता या सबबीखाली मातृभाषेच्या जागी इंग्रजीला बसविणे कालबाह्य व

मूर्खत्वपूर्ण झालेले आहे. त्यामुळे सेमी-इंग्रजी हा कारस्थानी प्रकार तर झिडकारला पाहिजेच परंतु कोणत्याही पातळीवरील शिक्षणाचे संपूर्ण मातृभाषीकरण हाच काळाबरोबर चालण्याचा एकमेव मार्ग आहे.

मराठी माध्यमाच्या विद्यार्थ्यांनी इंग्रजी माध्यमातून विज्ञान व इंग्रजी किंवा गणित व इंग्रजी असे दोन विषय एकाच वेळी एकाच शिक्षकाकडून शिकणे कितपत योग्य आहे वगैरे मुद्दे मांडले जातीलच. म्हणून त्या मुद्यांना फारसा स्पर्श न करता मला वरील मुद्दे प्रामुख्याने मांडावेसे वाटतात.

■

(दै० लोकसत्ता, दि० १७ ऑगस्ट २०१२मध्ये प्रसिद्ध झालेला लेख)

**तत्काल उपाययोजना करण्याची आवश्यकता**

जर माध्यम हळू हळू न बदलता एकदम बदललं तर गरज भागवण्याकरता म्हणून अगदी अल्पकाळातच पुस्तकं आणि शिक्षक मिळतील. आणि वर्षाच्या आतच आपल्या असं लक्षात येईल की आवश्यक ज्ञान परकीय भाषेतून घेण्यामध्ये आपण आजवर राष्ट्राच्या वेळाचं व शक्तीचं निष्कारण नुकसान करत होतो. जर प्रांत सरकारांना कोर्टावर हुकूमत चालवण्याचे अधिकार असतील तर सरकारी कचेऱ्या व कोर्ट ह्यांत प्रांतिक भाषा तत्काळ आणणं यशस्वी होऊ शकेल. जर आपल्याला सुधारण्याचजी आवश्यकता पटली असेल तर ती अडचण आपण अल्पकाळातच दूर करू शकू.

(हरिजन, दि० ३० जुलै, १९३८)



अनुक्रमणिका

# सेमी-इंग्रजीचा पुरस्कार आणि स्वीकार :
# एक समाजस्वास्थ्यविरोधी विचाराधित कृती

सुमन करंदीकर

**१.** अत्यंत दूरगामी परिणाम करणाऱ्या धोरणावर आणि त्याकडे योग्य त्या दृष्टीने बघण्याची आणि त्याचा पुनर्विचार करण्याची गरज समोर आणणारे व्यासपीठ तयार करून दिल्याबद्दल धन्यवाद.

२. सेमी-इंग्रजीचा निर्णय शाळापातळीवर का घेतला जातो, याचा विचार केला तर पुढील बाबी समोर येतात :

- इंग्रजीमुळे व्यक्तीला आपल्या सद्य सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीच्या पलीकडे जाण्याचा मार्ग खुला होतो (vertical and horizontal mobility) हा समज रूढ झाला आहे. मेकॉलेचा प्रभाव असे त्याचे वर्णन रूढ झाले आहे. त्यामुळे आपल्याला काही मिळवायचे असेल तर इंग्रजी आलेच पाहिजे ही मानसिकता रुजल्याने, इंग्रजी माध्यमाची शाळा नाही तर निदान इंग्रजीतून विज्ञान आणि गणित हे विषय मुले शिकली तर पुढचे शिक्षण सोपे जाईल हा समज रूढ होत आहे.
- अशी सोय आपल्या शाळेत केली नाही तर लायक मुले इतरत्र जातील आणि शाळेचा दर्जा खाली जाईल ही मानसिकताही रुजायला लागली आहे.
- सेमी-इंग्रजीची सोय केल्याने आपण काळाबरोबर आहोत, आपण नव्या गोष्टी स्वीकारतो याचा पुरावा देत आहोत; त्यामुळे पालकांना आपल्याच शाळेची निवड करायला एक दमदार मुद्दा आपण देत आहोत असा विचारही होत राहतो. इतर शाळांच्या बरोबरीने राहायला हवे ही अनिवार्यता सेमी-इंग्रजी स्वीकारताना शाळांना या निर्णयाच्या परिणामकारक कार्यवाहीसाठी शिक्षकांची, पालकांची आणि सेमी-स्वीकारण्याऱ्या मुलांची आवश्यक ती तयारी केली पाहिजे हे व्यावसायिक भान ठेवण्याची काळजी घेणे हे जवळपास विस्मरणातच जात असावे असे दिसते. सेमी-इंग्रजीचे दीर्घ कालीन होणाऱ्या परिणामांचा विचार करण्याची गरज जाणवत नसावी कारण आपल्या कृतीचे परिणाम कोणते होतात या तऱ्हेचा विचार करणारे नेतृत्व अभावानेच आढळते.





अनुक्रमणिका

३. सेमी-इंग्रजीचे परिणाम कोणते होत आहेत? आणि त्यामुळे भविष्यात काय घडणार आहे? : एक धावता आढावा

**शिक्षक-वर्तन आणि परिणाम**

(हे नोंदवताना अनेक सेमी-इंग्रजी शाळात शिकवणाऱ्या गणित व शास्त्राच्या आणि इतर विषयांच्या शिक्षकांशी झालेल्या प्रसंगोपात्त चर्चेतून जी वस्तुस्थिती समोर येत आहे त्याचा उपयोग झाला आहे.)

- गणित आणि शास्त्र हे विषय इंग्रजीत शिकवण यासाठी त्या विषयांवर आशयावर प्रभुत्व हवे. ते आहे हे गृहीत धरू. कारण आवश्यक पात्रता (किमान कागदावरची) आहे म्हणूनच हे विषय शिकविण्याची जबाबदारी सोपविली जाते हे निरीक्षण आहे. तथापि हे विषय वर्गात स्पष्ट करण्यासाठी लागणारी इंग्रजीवर पकड आहे की नाही याची खातरजमा होताना दिसत नाही. महाविद्यालयात माध्यम इंग्रजी. त्यामुळे हे विषय इंग्रजीत स्पष्ट करण्याचे सामर्थ्य आहेच हे गृहीत धरले जाते. तथापि वास्तवात अशा तऱ्हेचे भाषिक कौशल्य आणि भाषेवर प्रभुत्व प्राप्त झालेले नसल्याने शिक्षकात आत्मविश्वास कमी असतो.
- भाषेवरील प्रभुत्वाने येणाऱ्या उत्स्फूर्ततेस शिक्षक मुकतो.
- खऱ्या अर्थाने दोन भाषांचा वापर करण्याचेही प्रशिक्षण नाही. त्यामुळे वर्गात अनेकदा धेडगुजरी संप्रेषण चालू असते. अनेकदा मराठीत सांगून मोकळे होणे आणि मराठीत सांगितले की कळलेच असेही गृहीत धरले जाते. (एकूणच मी सांगितले आणि ते मातृभाषेत असेल तर शंभर टक्के खात्री की मुलांना ते कळलेच या समजुतीचे आपण शिकार झाले आहोत हे विसरता येतच नाही.)
- या भाषिक दुर्बलतेमुळे संबोधांची, संकल्पनांची स्पष्टता करणे अवघड जाते.
- मुलांनाही भाषेची अडचण. त्यामुळे शंका विचारणे, प्रश्न विचारणे या प्रक्रिया घडतच नाहीत. (अर्थात एकूणच प्रश्न विचारण्याची संस्कृती विकसित झाली नसल्याचाही हा परिणाम असू शकतो.)
- पर्याय राहतो - परीक्षेत यश मिळण्यासाठी काय करायचे? स्वाभाविकपणे सोपा पर्याय निवडला जातो कारण येथे स्वतःला फर कष्ट न घेता मुले खूष पालक खूष अशी win win situation तयार झाल्याचा आभास निर्माण होतो. उत्तरे उतरवून देणे हा मार्ग स्वीकारला जातो.

- शिक्षक आशय इंग्रजीत व्यक्त करण्याच्या असमर्थतेमुळे सतत दडपणाखाली राहतो.
- त्यामुळे स्वतःची अध्यापनाची तयारी म्हणजे प्रश्नोत्तरे या तऱ्हेनेच तयारी करायला प्रवृत्त होतो.
- तयार उत्तरांमुळे मुले खूष पालक खूष! कारण मार्क मिळणे आणि मार्कांमुळे मिळणारे सारे पुढचे फायदे दिसत असतात. ही बेगडी खुषी अनर्थकारक आहे हा विचार करण्याचेच विचार सामर्थ्य गमावून बसलेले शैक्षणिक नेतृत्व हे सेमी-इंग्रजीच्या कृतीतून स्पष्टपणे समोर येते आहे.
- (पाठ करणे आणि उतरवणे म्हणजे समजले या चुकीच्या सार्वत्रिक समजामुळे सेमी-इंग्रजीच्या वर्गात समज विकसित होण्याची प्रक्रिया घडते अशी चुकीची समजूत तयार होते. मूले कुठारः असे काही घडते आहे याचाही बोध होत नाही.)
- परीक्षेचा निकाल उत्तम.
- शाळा, संस्था सारेच खूष.
- शिकण्याची प्रक्रियाच कुंठित करणारी अनैसर्गिक वर्ग स्थिती असे अशैक्षणिक वास्तव तयार होत राहते. प्रत्यक्षात मुले पुढे जावीत, त्यांना इंग्रजीत विषय आल्याने पुढचे शिक्षण सोपे होईल या खोट्या आशेपायी मुलांचे शिक्षणच घडत नाही,

४. **विद्यार्थी-वर्तन आणि परिणाम**

- सेमी-इंग्रजीला विद्यार्थी निवडून वेगळी तुकडी करण्याने आपण कोणी विशेष अशी भावना निर्माण होते असे शिक्षकांशी केलेल्या चर्चेतून समोर येते. हा भाग विद्यार्थ्यांच्या निकोप घडणीसाठी चांगला नाही.
- पाठांतराने मिळणाऱ्या गुणांनी तत्काल फायदा मिळतो. तथापि शिकण्याच्या मूळ बोधात्मक, भावनात्मक आणि कौशल्यात्मक प्रक्रियांवर प्रभुत्व, निदान त्यांचा परिचय होणे या गोष्टी बाजूलाच राहतात.
- या साऱ्याचा परिणाम विद्यार्थ्यांच्यात आत्मविश्वास निर्माण न होण्यात होताना दिसतो. (१९६८च्या सुमारास रॉबर्ट गोदिनो यांच्या भारतीय विद्यापीठांवर लिहिलेल्या पुस्तकांतील निरीक्षणाची येथे तीव्रतेने आठवण होते. त्यांनी असे म्हटले होते की विद्यार्थी महाविद्यालयात वावरतात; तथापि उच्च शिक्षणाच्या मूलभूत विचार प्रक्रियेपासून ते दूरच असलेले दिसतात. ती परिपक्वता वर्तनात

दिसत नाही. सतत घोळक्यात दबकत दबकत वावरणारे हे विद्यार्थी आत्मविश्वासाने काही करतात असे दिसत नाही. शंका विचारायला जातानाही घोळकाच जातो.)

- विषयावर प्रभुत्व मिळण्यासाठी ज्या भाषेतून तो व्यक्त करायचा ती भाषा उत्तमपणे आत्मसात असणे हे आवश्यक आहे. तथापि सेमी-इंग्रजी घेतलेल्या मुलांचे इंग्रजीवरील प्रभुत्व पाठ्यपुस्तकावरील प्रश्नांच्या पाठ करून लिहिलेल्या उत्तराएवढेच असे. त्यामुळे विषय समजून त्याचा आनंद मिळणे ही गोष्ट अनुभवताच येत नाही.
- स्व-अभ्यासाची कौशल्ये विकसित न झाल्याने सतत कोणत्या ना कोणत्या तरी तयारी वर्गात अडकलेले हे विद्यार्थी ओझे बाळगत जगतात. त्या ओझ्याची जाणीवही न व्हावी इतके, विचार न करता घाण्याला जुंपलेल्या बैलासारखे जगणे या मुलांच्या वाटेला येत आहे. मार्क म्हणजे उत्तम तयारी या चुकीच्या समजुतीत सगळेच विद्यार्थी अडकले आहेत. तथापि इंग्रजीत ते करणे याचे ओझे सेमी-इंग्रजीच्या विद्यार्थ्यांना अधिकच बाळगावे लागते.
- आपल्या भाषेतून सहजी मिळणाऱ्या पोषणापासून यांना सेमी-इंग्रजीचा पर्याय वंचित करतो. सेमी-इंग्रजीवाल्यांची ना घरचा ना दारचा अशी अवस्था होऊन जाते.

### ५. सेमी-इंग्रजीचा आग्रह कशातून आला?

स्वातंत्र्यपूर्व काळात, इंग्रजी अमलात इंग्रजी येणे शिकणे हे पुढे जाण्याचे, प्रतिष्ठित होण्याचे हुकमी नाणे होते. स्वतंत्र झालो तरीही प्रतिष्ठा आणि आर्थिक सुबत्ता यांच्याशी इंग्रजीचे जोडले गेलेले नाते अतूट राहिले. किंबहुना अपेक्षांचा उद्रेक म्हणून ज्याचे वर्णन होते त्या गोष्टींमुळे प्रतिष्ठा मिळवायचा मार्ग म्हणजे इंग्रजी येणे आणि त्या आधारे पुढे जाण्याचे प्रयत्न करताना तशा सोयी, संधी सर्वांना उपलब्ध कशा होतील याचा आग्रह धरणे हे स्वाभाविक बनले. त्यामुळे इंग्रजी माध्यमाच्या शाळांची वाढती मागणी आणि त्याला स्वस्त पर्याय म्हणून सेमी-इंग्रजी हा विचार बळावला. या ठिकाणी इंग्रजी माध्यमात कोण जाते आणि सेमी-इंग्रजी कोण घेते या सामाजिक मागणीच्या पृथक्करणात काय आढळते? इंग्रजी माध्यमाच्या शाळा या संपन्न उच्च वर्ग आणि मध्यम वर्गातील मुलांसाठी आहेत. त्यांच्या घरी फार ना थोडे तरी इंग्रजी भाषेचे जाणकार अपेक्षिता येतात. हे पालक स्वतः उच्च शिक्षण घेतलेले, अभ्यासाची सवय

असलेले, शिक्षणाच्या गरजांशी थोडे फार परिचित असण्याची शक्यता असते. तथापि असे वातावरण आणि आर्थिक सुबत्ता जी इंग्रजी माध्यमाच्या शिक्षणाशी संगत गृहीत आहे ती सुबत्ता नाही. परंतु अपेक्षा आहेत.आपल्या मुलांनीही डॉक्टर, वकील, इंजिनीअर, आता आयटीत काम करणारे व्हायला हवे या अपेक्षा वाढत आहेत. या व्यावसायिक आणि समाज प्रतिष्ठा देणाऱ्या शिक्षणक्रमांसाठी इंग्रजी अनिवार्य आहे, तसेच शास्त्र आणि गणित हे विषय इंग्रजीतून येणे अनिवार्य आहे ही पक्की समजूत झालेली आहे. सर्वच व्यवसाय प्रतिष्ठित आहेत, सर्वांसाठी स्वाध्यायाची कौशल्ये आणि सवयी हव्यात हा विचार एकूण समाज मनाला काय, शिकलेल्या लोकांनासुद्धा स्वीकारणे अवघड आहे. त्यामुळे कसे का होईना गणित आणि शास्त्र हे विषय इंग्रजीतून शिकण्याने विज्ञान शाखेतील उच्च शिक्षणासाठी फायदा होईल या तर्काच्या आधारे सेमी-इंग्रजीची मागणी वाढती राहिली. अनेकांनी सेमी-इंग्रजी म्हणजे संधीची समानता देण्याचा सोपा राजमार्ग असे त्याकडे पाहिले. संधीची विषमता कमी करणारे मार्ग अनेकदा त्यांच्या भविष्यातील परिणामांचा विचार न करताच स्वीकारले जातात. तसेच येथेही घडले. जागतिकीकरणाच्या रेट्यात इंग्रजी अपरिहार्य हा विचार ही बळावला. इंग्रजीचे व्यापारीकरण झाले. भाषा एक माध्यम आणि भाषा एक विषय यातील फरक, त्याचे होणारे अध्ययनप्रक्रियेवरील परिणाम, त्याचे होणारे मानसिकतेवरील परिणाम अशा कोणत्याच गोष्टीवर शास्त्रशुद्ध विचार करायला समाजमानसाला वेळ नव्हता. निर्णय घेणाऱ्यांना, सल्ला देणाऱ्यांना भवितव्यात या धोरणाचे परिणाम कोणते होतील याचा विचार करून कृती करायला हवी हे समजले तरी ठामपणे म्हणणे जमले नाही, कदाचित असे म्हणणे म्हणजे वंचितांच्या विकासात अडथळा करण्याचे पाप आपण करतो आहोत ही अपराधलेपणाची भावना त्रासदायक झाली असेल. कारण काहीही असो. सेमी-इंग्रजीचा निर्णय झाला. त्याचे होणारे परिणाम ध्यानात न घेता निर्णय झाला.

**६ परिणामांचे स्वरूप आणि त्यातून घडणारे समाजाचे म्हणजेच पर्यायाने राष्ट्राचे नुकसान**

सेमी-इंग्रजीच्या विद्यार्थ्यांना मातृभाषेतून शिकण्यात जी सहजता असते त्याला मुकावे लागते. संकल्पना स्पष्टतेसाठी जी उदाहरणे, जी निरीक्षणे सहजासहजी संदर्भ म्हणून देता येतात ती देण्यात शिक्षक आणि मुले असमर्थ ठरतात. कारण त्यांना तशा प्रकारची सहजता इंग्रजीत नसते. विद्यार्थ्याला इंग्रजीतील परिभाषा आत्मसात करता करताच नाकी नव येतात; त्याला ती परिभाषा आपली वाटत नाही कारण त्या शब्दांचे आणि आपले अनुभव व्यक्त करणारे शब्द यांचे नातेच जुळत नाही. त्यामुळे पाठांतराचा

मार्ग स्वीकारला जातो. या मुलांचे गणित आणि शास्त्र दोन विषयांतील लेखन पाहिले तर त्यात लिखाणाच्या चुका सहजी आढळतात कारण टिपण उतरवून देताना सांगितलेले अचूक उतरविणे कठीण जाते. त्यांचे त्यांच्याच लिखाणाचे वाचन पाहिले तर ती अडथळ्याची शर्यतच ठरते. उतरवून घेतलेले समजलेले असत नाही. परीक्षेत शिक्षक गुणदान करताना मुलांकडून जे काही लिहिले जाते त्याचा अर्थ जाणून गुण दिले जातात. प्रत्यक्षात ती संकल्पना समजल्याची खूणगाठ उपयोजनाच्या प्रश्नांच्या साहाय्याने करता येते. तथापि आपल्या परीक्षेत विचारले जाणारे प्रश्न हे फक्त स्मरणाचीच परीक्षा घेणारे विचारले जातात. त्यामुळे शास्त्र आणि गणित खरे कळले किती हे समजणे दुरापास्तच होते. अशा परिस्थितीत वेगळा विचार करणे, वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या विकासाची काळजी घेणे, स्वतःच्या विचाराने शास्त्रीय प्रकल्प करणे अशा सारख्या खऱ्या अभ्यासकाची निगराणीपूर्वक तयारी घडावी असे वातावरण निर्माण होण्यातच अडथळे येतात. कारण सारा वेळ आशय पाठांतर आणि स्मरणावर आधारलेली परीक्षा पास होणे याच्या चिंतेतच जातात. ज्या उच्च शिक्षणाला विद्यार्थी जाणार त्याठिकाणी अभ्यासक म्हणून जी मानसिकता घेऊन त्यांनी जायला हवे त्याकडे दुर्लक्ष होते. गणित आणि शास्त्र या विषयांकडे दिला जाणारा वेळ आणि इतर विषय मराठीत म्हणजे वाचले की झाले, किंवा उत्तरे पाठ केली की झाले असा शॉर्टकट शोधणे यात काहीच गैर वाटत नाही. या साऱ्या गोष्टींमुळे अध्ययन अध्यापन अभ्यासक या साऱ्या संज्ञांना अर्थशून्य करून टाकले आहे. या शब्दांची आणि विद्या प्राप्त करण्यासाठी जी बौद्धिक भावनिक आणि कौशल्यात्मक गुंतवणूक करायची सवय लागण्याकडे लक्ष द्यायला हवे त्याबद्दल कोणीच काहीही बोलत सुद्धा नाही. यासर्व बाबींची ऐशीतशी होण्याची गती वाढती राहण्याचे मूळ कारण मातृभाषेतून होणाऱ्या शिक्षणाने समज विकसित होण्याची प्रक्रिया विकसित होण्यात शाळेआधी आणि शाळेबरोबर घर आणि परिसराचे असलेले योगदान ध्यानात घेण्याचीच गरज वाटत नाही. या एका मूलभूत गोष्टीकडे केले जाणारे दुर्लक्ष आपल्याला फार मोठी किंमत द्यायला लावणार आहे. मातृभाषेसंदर्भात झालेले संशोधन, त्यासंदर्भात इतर देशांचा अनुभव या साऱ्याकडे दुर्लक्ष करण्याचा अविचार केलेला आहे. मूल कितीही भाषा शिकू शकते; त्याला इंग्रजीत का नाही जमणार? या विचारधारेत एक मोठा गोंधळ आहे. तो बाजूला होण्याची गरज आहे. तो म्हणजे भाषा केव्हा येते याची सत्यता न समजावून घेणे आणि भाषा आणि शिकण्याचे आशय समजावून घेण्याचे माध्यम कोणती भाषा केव्हा होऊ शकते याबद्दलचा विचार स्पष्ट नसणे. मातृभाषासुद्धा न आत्मसात होता माध्यम म्हणून इंग्रजीचा वापर गणित आणि शास्त्रासाठी करणे म्हणजे या दोन विषयांतील असमज वाढती ठेवणे एवढेच अशैक्षणिक

काम करणे असे नसून समाजाच्या भावी पिढीच्या बोधात्मक, भावनात्मक आणि कौशल्यात्मक विकसन प्रक्रियेशी खेळणे आहे. समाजातील फार मोठा भाग एकविसाव्या शतकातील समर्थपणे जगण्यासाठी आवश्यक असलेली जीवन कौशल्यांची काळजी न करणारा आणि सर्जनतेची नाळ न जपणारा, वेगळा विचार आणि आचार करण्याची क्षमता कुंठित झालेला असा तयार करण्याचे काम सेमी-इंग्रजीची प्राथमिक आणि माध्यमिक शाळांत कार्यवाही केल्याने होणार आहे याकडे दुर्लक्ष करणे म्हणजे आत्मघातच आहे.

**७ दुबळी, आत्मविश्वास नसलेली पिढी निर्मिती रोखण्यासाठी काय करायचे?**

उत्तर आहे एकच. मातृभाषेत शिकण्याचा एकच मार्ग. याला पर्याय नाही. माध्यम भाषा आणि भाषा यातील फरक समजावून देणे आणि मातृभाषेतून शिकण्याने शिकणे आनंददायी आणि गतीचे होते आणि स्मरणासोबत विचाराच्या प्रक्रियेशी ते जोडले जाते याची जनमानसाला समजूत पटेल असा शास्त्रशुद्ध प्रसार करणे. पालक-शिक्षक यांच्या प्रबोधनासाठी संवाद साधणारे म्हणून माध्यमांचे उद्बोधन करणे संशोधनाचा आधार घेताना त्याची सर्वांगाने तपासणी करून जे सार्वत्रिक आहे त्याचाच आधार घेतला जात आहे ना हे तपासणारे आंतरशाखीय व्यासपीठ कार्यान्वित करणे. शॉर्टकटनी संधीची समानता देण्यातून होणारे नुकसान टाळण्यासाठी बालशिक्षणात मातृभाषा हीच शिक्षणाची भाषा हवी, त्यातून मूल शिकण्यास समर्थ बनते, पुढे जाण्याची ताकद मिळवते यावर सर्व बाजूंनी सातत्याने चर्चा आणि कृती करण्यावर भर दिला पाहिजे. मातृभाषेतून शिकलेल्यांचा आणि स्वतःच्या वंचिततेवर मात केलेल्यांच्या व्यक्ति-अभ्यासांवर लक्ष केंद्रित केले पाहिंजे. वेळीच मातृभाषेतून शिक्षण देण्याकडे दुर्लक्ष करण्याच्या आणि जागतिक भाषांच्या भाषा म्हणून शिक्षणाचा विचार करण्याकडे अग्रक्रमाने लक्ष देणे अग्रक्रमाने घडले पाहिजे. सेमी-इंग्रजीचा नाद लवकरात लवकर सोडव रे बाप्पा अशी विनवणी सर्व स्तरावरच्या नेतृत्वाला करण्यासाठी जागरण गोंधळ जे जे काही जनप्रबोधनासाठी करायला हवे ते केले पाहिजे. कारण राजा रात्र वैऱ्याची आहे. स्वतःचा संभाळ करायला आणि जगात ताठ मानेने जगायला शिकणे घडले पाहिजे आणि त्यासाठी मातृभाषेला पर्याय नाही हे उमगले पाहिजे आणि कृतीत यायला प्रयत्नांची शिकस्त करायला प्रेरणा जागी व्हायला हवी.

■





अनुक्रमणिका

# सेमी-इंग्लिश संदर्भातील वास्तव

- शीला कोलटकर

**प्रस्तावना**

डॉ० वसंत काळपांडे व डॉ० वीणा सानेकर यांच्या विचारांचा मी परामर्श घेतला. राष्ट्रीय शिक्षण आराखडा २००० आणि महाराष्ट्र शिक्षण आराखडा २०१० यांमधील तत्त्वांचा अभ्यास केला तर त्यातील तत्त्वे, विषय अध्यापन-अध्ययन माध्यमाचा स्पष्ट निर्देश करतात (१.३.५ पृष्ठ २०). या संदर्भात विद्यार्थ्यांच्या घरातील भाषेला शिक्षण व्यवहारात मानाचे व आपुलकीचे स्थान देणे अत्यावशक असल्याचे म्हटले आहे. मातृभाषेतून शिक्षण हा मुलाचा हक्क आहे. यामध्ये 'बालस्नेही शिक्षणाचा' आग्रह धरलेला आहे. 'सेमी-इंग्लिश' ही संकल्पना या विचाराला छेद देणारी आहे. सेमी-इंग्लिश माध्यमाचा निर्णय हा सामाजिक परिस्थितीच्या रेट्यातून झाला आहे. तो अशैक्षणिक असून विद्यार्थ्यांवर अध्ययनाचे ओझे लादणारा आहे असे वास्तवात जाणवते. त्यासाठी प्रथम ज्ञान संपादन प्रक्रियेचा विचार करू.

**माध्यम विचार व ज्ञान संपादन प्रक्रिया**

मुलांच्याबाबत विचार करणे, विषयातील आशयाचे आकलन होणे, आशय आत्मसात होणे, त्या ज्ञानाच्या आधारे संबोध निर्मिती होणे, व्यवहारात त्यातून निर्मित झालेल्या नियमांचे उपयोजन करता येणे, नवनिर्मिती करता येणे या प्रक्रिया मातृभाषेतून नैसर्गिकपणे आणि सुलभपणे होतात. त्यामुळे माहितीचे ओझे न वाटता मुलांचे शिक्षण सहज व आनंदाने घडते. इंग्लिश माध्यम मात्र मुलांमधील या प्रक्रियांमध्ये अडथळा ठरताना दिसत आहे. आकलनाच्या पातळीवरच ही प्रक्रिया गुंतागुंतीची होते. आकलन झाले तरी सेमी-इंग्लिशच्या संदर्भात प्रथमतः विचार मातृभाषेतून होतो आणि त्याची मांडणी इंग्लिश भाषेतून करताना अडचणी येतात. कारण दोन्ही भाषांची नियम व्यवस्था अभिव्यक्तीसाठी निश्चितच वेगळी आहे. इंग्लिश भाषेवर प्रभुत्व असल्यासच ते शक्य होते, अन्यथा विद्यार्थ्यांवर अतिरिक्त ताण येतो. त्यासंबधी विचार होणे अगत्याचे आहे. या प्रक्रियेतील शिक्षकांची भूमिका महत्त्वाची ठरते.

**शिक्षकांचे अध्यापन**

विद्यार्थ्यांना अध्ययन करताना शिक्षकांच्या अध्यापन पद्धतींमुळेसुद्धा आणखी अडचणी निर्माण होतात. पाठ्यपुस्तकातील मजकूर वाचणे, त्याचे शक्यतो भाषांतर





अनुक्रमणिका

करणे व समजून देण्यासाठी म्हणून मातृभाषेचा वापर करावा लागतो ही मानसिकता असणे, पाठ्यपुस्तकातील व मार्गदर्शिका यांमधील प्रश्नांची उत्तरे लिहून देणे, कित्येकदा प्रश्नांच्या उत्तराखाली अधोरेखन करायला सांगून ती पाठ करण्यास सांगण्यापर्यंत अशास्त्रीय अध्ययन-अध्यापन पद्धतींचा वापर होताना दिसतो. त्यामुळे या दोन्ही विषयांची उद्दिष्टे साध्य करण्यात विद्यार्थी यशस्वी होऊ शकत नाही. निरीक्षणातून आलेली या दुष्टचक्राची महत्त्वाची कारणे नोंदविणे आवश्यक वाटते.

सेमी-इंग्लिश मधून शास्त्र व गणित शिकविणाऱ्या शिक्षकाचे मानधन शासन देत नाही. हा आर्थिक भार संस्थांना उचलावा लागतो. संस्था लहान असल्यास हा आर्थिक भार उचलताना शिक्षक नेमणुकीमध्ये अपरिहार्यपणे तडजोड करावी लागते. अशा शिक्षकांकडून मुले अध्ययनातून नवनिर्मितीच्या आनंदाच्या उद्दिष्टाप्रत पोहोचतील हा आशावाद भाबडाच ठरतो. असे अध्ययन ज्ञानाधारित न राहता गुणाधारित होते. या मानसिकतेमुळे उच्चतर विचार प्रक्रियांना कमी वाव मिळत असल्याने पुढील जीवनात या माध्यमामुळे यश प्राप्त होते का हा संशोधनाचा विषय ठरतो.

**पालकांची विचारसरणी**

अध्ययनाचे माध्यम हा निर्णय बहुतांशी पालक घेतात. बुद्धिमान विद्यार्थी आपल्या गतीने यश प्राप्त करतात तेव्हा 'अध्ययनाचे माध्यम' हा प्रश्न दुय्यम ठरतो, पण सर्वसामान्य विद्यार्थ्यांच्या बाबतीत मात्र हा प्रश्न गुंतागुंतीचा ठरतो. त्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे 'इंग्लिश माध्यम म्हणजेच दर्जेदार शिक्षण'; जीवनातील स्पर्धेत टिकण्यासाठीही इंग्लिश माध्यमच उपयुक्त ठरते, हा पालकांचा दृष्टिकोन होय. तसेच आपल्याला ही संधी मिळाली नाही म्हणून ती आपल्या पाल्याला मिळण्याचा ते अट्टहास धरतात. अशा विचारसरणीत शिक्षित व आर्थिक-सामाजिकदृष्ट्या उच्चतर वर्गाचे अनुकरण ते करतात. अशा घरांतून पालकांकडून मिळणारे मार्गदर्शन व अन्य संधी पाल्याला निश्चित उपयुक्त ठरतात याचे भान असा दृष्टिकोन असणाऱ्या पालकांना कित्येकदा असत नाही. मग पाल्यावर केलेल्या खर्चाचा वारंवार उल्लेख, त्याच्या अपयशाची जाणीव, इतरांशी तुलना, या व अशांसारख्या प्रवृत्तींमुळे विद्यार्थ्यांचा आत्मविश्वास कमी होतो. परिणामतः तो ज्ञानापासून दूर जातो, त्याचे मानसिक संतुलन बिघडण्याची उदाहरणे दिसतात. या माध्यम प्रश्नातून आणखी एका प्रश्नाची निर्मिती होते. त्याचाही विचार आवश्यक ठरतो.





अनुक्रमणिका

### विषयांचे महत्त्व

विद्यार्थ्यांच्या जीवनात या विषयांची काठिण्य पातळी आणि माध्यम यामुळे या दोनच विषयांना प्राधान्य दिले जाते. अन्य विषयांमधून त्यांचा होणारा व्यक्तिमत्व विकास हा दुर्लक्षिला जातो. इतकेच नव्हे तर कला, छंद, खेळ इ० यांना पारखा झालेला हा विद्यार्थी कित्येकदा जीवनातील आनंदाला पारखा झालेला दिसतो. या सर्वांचा परिणाम फक्त व्यक्तिजीवनावरच नव्हे तर सामाजिक जीवनावरही पडताना दिसेल. 'पण लक्षात कोण घेतो...' ही स्थिती समाजमन ढवळून निघाल्याशिवाय बदलणार नाही. त्यासाठी द्रष्टेपणाने उपाययोजना कराव्या लागतील.

**जपानचं उदाहरण**

जपानमध्ये काय घडलं ते तुम्हांला माहीतच आहे. जपानी शाळाकॉलेजांत हजारो मुलंमुली जपानीतूनच शिकतात. इंग्रजीतून नव्हे. त्यांची लिपी अवघड आहे. पण, त्यामुळे त्यांच्या शिक्षणात कुठंही अडथळा आला नाही व रोमन लिपीसाठी त्यांनी ती टाकूनही दिली नाही. त्यांनी इंग्रजी व इतर युरोपीय भाषांवर बहिष्कारही घातला नाही. पण त्यांनी आपली शक्ती वाचवली. जे ज्ञान पाश्चात्यांकडूनच मिळू शकेल त्याचा उपयोग जपानी समृद्ध करण्याकरता व्हावा म्हणूनच काहीजण त्या भाषा शिकतात. पाश्चात्यांकडून जे घेण्यालायक असेल त्याचं रूपांतर जपानीत करण्याची ते काळजी घेतात. त्यामुळेच जपानी तरुणाचं मन ताजं व तत्पर असतं. ह्या प्रकारे मिळवलेलं ज्ञान राष्ट्रीय संपत्ती बनतं.

जपानची इतकी झपाट्यानं प्रगती होण्याचं कारण म्हणजे त्यांनी पाश्चात्य शिक्षण मर्यादित लोकांकरताच राखून ठेवलं. आणि त्याचा उपयोग जपानी समृद्ध करण्याकरता केला. जर त्यांना परकीय भाषेतून हे काम करावं लागलं असतं, तर जपानची इतकी प्रगती कधीही झाली नसती.

('हरिजन', दि० १ फेब्रुवारी, १९४२)

# सेमी-इंग्रजी : एक घातक भ्रम

अनिल गोरे

१९८५पर्यंत शालेय/उच्चशिक्षण क्षेत्रात महाराष्ट्र भारतात आघाडीवर होता. २०१२मध्ये भारतातील ३५ राज्यांच्या क्रमवारीत महाराष्ट्र सतराव्या स्थानावर आहे. जगातील पहिल्या ५०० उच्चशिक्षण संस्थांमध्ये काही वर्षांपूर्वी भारतातील दोन संस्था होत्या, तर आता फक्त एक आहे. इंग्रजी परकी भाषा असूनही इंग्रजीकेंद्रित शिक्षण देण्याचा हट्ट धरणाऱ्या सर्व देशांतील संस्था जागतिक क्रमवारीत मागे पडत आहेत. ज्या देशांतील शालेय आणि उच्चशिक्षणाचे भाषा माध्यम इंग्रजीपेक्षा सक्षम आहे, अशा देशांतील संस्था क्रमवारीत पुढे आहेत. जगातील ज्या सहा देशांत इंग्रजी मातृभाषा असल्यामुळे इंग्रजी हेच शालेय आणि उच्चशिक्षणाचे प्रमुख भाषा माध्यम आहे, तेथील शालेय विद्यार्थी गणित आणि विज्ञानात इतर देशांपेक्षा खूप मागे आहेत. जगाच्या इतिहासात गणित/विज्ञान संबंधी जे मूलभूत संशोधन आजवर झाले त्यात इंग्रजी भाषकांचा वाटा अत्यल्प आहे आणि गणितात तर नगण्यच आहे. इंग्लंड या इंग्रजीच्या मूळभूमीत यापूर्वी जे मूलभूत संशोधन झाले ते मुख्यत: फ्रेंच, लॅटिन, जर्मन भाषकांनी केले आहे. जगातील पहिली इंग्रजी माध्यम शाळा १७१० साली इंग्लंडमध्ये सुरू झाली, त्यानंतर शंभर वर्षांत तिथल्या शालेय शिक्षणाचे प्रमुख माध्यम इंग्रजी झाले. तेव्हापासून इंग्लंडचे विद्यार्थी गणित/विज्ञान विषयात जगापेक्षा मागे पडले आणि त्या देशातील स्थानिकांचे या विषयातील मूलभूत संशोधन थंडावले आहे. इंग्रजीतून विविध विषय नीट आणि सखोल स्वरूपात समजत नाहीत, ही आपली मराठी लोकांची अडचण आहे, असे आपल्याला वाटते. तथापि ही केवळ आपली अडचण नसून ही इंग्रजीची आहे.

इंग्रजीतून शिकल्यामुळे जसे इंग्रजांना गणित कळले नाही, तसेच मराठी मुलांनाही कळले नाही. जिथे इंग्रजी/ सेमी-इंग्रजी माध्यम आहे, तिथे मुलांना गणित/विज्ञान विषय नीट समजत नाहीत. घोकंपट्टीवर परीक्षा निभावून नेली जाते. इंग्रजी/सेमी-इंग्रजी माध्यम सुरू झाल्यापासून महाराष्ट्रातील विद्यार्थी गणित/विज्ञान विषयात मागे पडत आहेत. एसएससी बोर्डाने १९७२ ते १९८५ दरम्यान आठवी ते दहावीसाठी गणित/विज्ञान विषयांचा राबविलेला अभ्यासक्रम सर्वोत्तम होता. यापैकी गणिताचा अभ्यासक्रम ४० वर्षांत अनेकदा बदलून १९७५च्या अभ्यासक्रमातील ७० टक्क्यांहून अधिक घटक वगळले, पण कोणतेही नवीन घटक वाढले नाहीत.

परीक्षेत भरपूर गुण मिळूनही गणित नीट न समजल्याने इंग्रजी/सेमी-इंग्रजी माध्यमातील विद्यार्थ्यांच्या मनात गणिताबाबत भीती निर्माण होते. या भीतीमुळे गणितातील तथाकथित अवघड भाग वगळण्याची मागणी वारंवार होते. गणिताच्या अभ्यासक्रमातील महत्त्वाचा ७०% भाग अशा मागण्यांमुळे वगळावा लागला आहे. सर्वसामान्य मुलांना १९७५ साली शिकवणी न लावता तेव्हाचे दहावी मराठीतील गणित पुस्तक स्वत: प्रयत्न करून सोडवता येत होते. त्या पुस्तकातील ७०% भाग वगळूनही ते फार अवघड आहे अशी ओरड २०१२ साली होते आहे. १९७५च्या पुस्तकातील अवघड वाटणारी सर्व गणिते आणि अवघड वाटणारा सर्व भाग वगळला तरी प्रत्येक विद्यार्थ्याला महागडी शिकवणी लावावी लागते. दर दहा वर्षांनी गणिताचा अभ्यासक्रम कमी केला तरी उरलेला अभ्यासक्रम काही विद्यार्थ्यांना कठीण वाटतो म्हणून त्याहून हलका सामान्य गणित हा पर्याय गेल्या काही वर्षांत उपलब्ध केला आहे. विज्ञानाच्या अभ्यासक्रमातही गणिताइतकी नसली तरी बरीच काटछाट करावी लागली आहे. गणित/विज्ञान शिकण्यासाठी इंग्रजी ही भाषा माध्यम म्हणून निरुपयोगी असल्याने या दोन विषयांचे असे धिंडवडे निघत आहेत. माध्यम म्हणून इंग्रजीचा उपयोग केल्याने काय नुकसान झाले ते समजण्यासाठी पुढील उदाहरणे बोलकी ठरावीत :

काही शिक्षकांच्या आग्रहाने पुण्यातील मराठी माध्यमाच्या नूतन मराठी विद्यालयात १९८२ साली सेमी-इंग्रजी सुरू झाले. १९०५ ते १९८५पर्यंत या शाळेचे मॅट्रिक परीक्षेच्या गुणवत्ता यादीवर वर्चस्व होते. दर दहा वर्षांतील पाच ते सहा वर्षे या शाळेचा मुलगा मॅट्रिकला महाराष्ट्रात पहिला येई आणि या शाळेतील अनेक मुले गुणवत्ता यादीत असत. सेमी-इंग्रजीची पहिली तुकडी १९८५ साली मॅट्रिक परीक्षेला बसली तेव्हापासून या शाळेतील कोणीही विद्यार्थी गेल्या २८ वर्षांत महाराष्ट्रात मॅट्रिकला पहिला आलेला नाही. गेली अनेक वर्षे या शाळेचे नाव गुणवत्ता यादीत दिसतच नाही. या शाळेनंतर पुण्यातील इतर आघाडीच्या शाळांनी त्यांचे अनुकरण केले. सर्व कष्टाळू, अभ्यासू मुले सेमी-इंग्रजीच्या तुकडीत ढकलण्याचा आत्मघातकी प्रयोग पुण्यातील अनेक मराठी माध्यम शाळांनी केला. याचा परिणाम म्हणून १९८५पासून गेल्या २८ वर्षांत पुण्यातील कोणताही विद्यार्थी/ विद्यार्थिनी महाराष्ट्रात मॅट्रिकला पहिले आले नाहीत. अलीकडील काही वर्षांत पुणे शहरात पहिला आलेला विद्यार्थी महाराष्ट्रात पहिल्या शंभरात नसतो. पुण्याचे स्थान गुणवत्ता यादीतून घसरल्यावर काही वर्षे लातूरच्या मधील मराठी माध्यमातील विद्यार्थ्यांचे गुणवत्ता यादीवर वर्चस्व होते.

लातूरमधील लोकांनाही दुर्दैवाने सेमी-इंग्रजीचा मोह झाला. सेमी-इंग्रजीचा मन:पूर्वक स्वीकार केल्यावर लातूरचे नावही मॅट्रिकच्या गुणवत्ता यादीतून दिसेनासे झाले.

सेमी-इंग्रजी घेतल्या क्षणापासून गणित/विज्ञान विषयातील बारकावे समजणे कमी झाले हे अनेक विद्यार्थ्यांना जाणवले. लहान वयामुळे आणि माहिती अभावी हा इंग्रजी भाषेतील त्रुटींचा वाईट परिणाम आहे हे त्यांना समजले नाही. इंग्रजी भाषेवर प्रभुत्व नाही, म्हणून आपल्याला हे विषय समजण्यात अडचण येते असे त्यांना वाटू लागले. पहिलीपासून इंग्रजीत शिकल्यास कदाचित गणित/विज्ञान नीट समजेल असे वाटून पुढे त्यांनी आपली मुले इंग्रजी माध्यमात घातली. ज्यांना इंग्रजी माध्यमाचा अफाट खर्च परवडला नाही त्यांनी मराठी माध्यमात मुले घालून त्यांच्यावर पाचवीपासून सेमी-इंग्रजी लादले. गणित/विज्ञान न कळण्याचा जो अनुभव सेमी-इंग्रजी घेतल्याने पालकांनी आठवीपासून घेतला तो अनुभव मुलांना पाचवी किंवा पहिलीपासून येऊ लागला. याचा घातक परिणाम अवघा महाराष्ट्र भोगतो आहे. सेमी-इंग्रजी घेतलेल्या बहुसंख्य मुलामुलींनी मोठे झाल्यावर त्यांना झालेली मुले इंग्रजी माध्यम अशी पाटी असलेल्या कोणत्याही शाळेत घातली. गेल्या पंचवीस वर्षांत भूछत्राप्रमाणे उगवलेल्या असंख्य इंग्रजी माध्यम शाळांमध्ये पुरेशी शैक्षणिक पात्रता असलेले शिक्षक नाहीत. कमी पात्रतेच्या ज्या शिक्षकांची भरती होते त्यांना प्रशिक्षण उपलब्ध नाही. इंग्रजी माध्यमाच्या बहुसंख्य शाळांमधील शिक्षकांनाच आपल्या विषयाचे सखोल ज्ञान नसल्याने वर्गात आत्मविश्वासाने मुलांसमोर उभे राहून विषय शिकवता येत नाही. या अडचणीवर मात करण्यासाठी त्यांनी मोठा नामी आणि अजब उपाय शोधून काढला आहे. विषय आणि विषयातील बारकावे शिकवणे सोडून या अनेक शाळांमधील शिक्षक विद्यार्थ्यांचे मोजे, पादत्राणे, कपडे, केस, गळबंद, नखांची स्थिती तपासण्याचे अशैक्षणिक काम करण्यात दररोज आपला शिकवण्याचा निम्मा वेळ घालवतात, असे गावोगाव आढळून येते. कपडे, केस, नखे रोज तपासणारी शाळा फार भारी आहे असे वाटून अनेक शिक्षितांनी आपली मुले इंग्रजी माध्यमात घालून अपुऱ्या तयारीच्या शिक्षकांच्या हाती सोपविली. या मानसिकतेमुळे मराठी माध्यमाच्या शाळांतील विद्यार्थी संख्या कमी होऊन इंग्रजी शाळांतील विद्यार्थीसंख्या वाढली. हा बदल होत असलेल्या नेमक्या या काळातच महाराष्ट्र देशात पहिल्या क्रमांकावरून सतराव्या क्रमांकावर घसरला. हे विषय नीट न समजल्याने अलीकडे इयत्ता अकरावीत विज्ञान शाखेला प्रवेश घेणारे विद्यार्थी कमी झाले. शास्त्रीय संशोधन करणाऱ्या संस्थांना तरुण संशोधक मिळत नाहीत.

गणित/विज्ञान इंग्रजीतून शिकण्याचा प्रयत्न करणे हेच मुळात चुकीचे आहे. गणित/विज्ञानातील ज्या संकल्पना इंग्रजांना इंग्रजीतून समजत नाहीत, त्या आपल्याला इंग्रजीतून समजतील या आशेमुळे महाराष्ट्राचे प्रचंड नुकसान झाले.

गणित/विज्ञान इंग्रजीतून नीट का समजत नाही आणि मराठीतून नीट का समजते याबाबत मी काही निरीक्षणे केली आहेत, ती अशी :

**मराठी शब्द लहान**

छेद-*denominator*, अंश-*numerator*, फलन-*fertilisation*, वेग-*velocity*, कलन-*derivative*, कर्ण-*diagonal*, वीज-*electricity*, प्रशासन-*administration*, गणित-*mathematics*, क्लिष्ट-*complicated*, हात-*hand*, प्रवास-*travel*, घर-*house*, परीघ-*circumference*, श्री-*shree*, गडहिंग्लज-*Gadahinglaj*, रेणू-*molecule*, महाराष्ट्र-*Maharashatra*, एकदिश-*unidirectional*. फारच थोडे मराठी शब्द त्यांच्या इंग्रजी प्रतिशब्दांपेक्षा मोठे आहेत. उदा० ओबडधोबड-*rough*, कार्यक्रमपत्रिका-*agenda* एकमेवाद्वितीय-*unique*. बहुसंख्य मराठी शब्दांना जितकी मराठी अक्षरे लागतात, त्यापेक्षा त्यांच्या इंग्रजी प्रतिशब्दांना दुप्पट ते पाचपट इंग्रजी अक्षरे लागतात.

बहुसंख्य मराठी वाक्ये त्यांच्या इंग्रजी भाषांतरापेक्षा छोटी असतात. (१) 'वस्तूवर बल लावल्याने वस्तूत प्रवेग निर्माण होतो' हे सात शब्द-एकवीस अक्षरांचे मराठी वाक्य इंग्रजीत 'When force is applied on a body, the acceleration is produced in that body' असे पंधरा शब्द-एकसष्ट अक्षरी होते. या वाक्यात मराठीमुळे सुमारे पासष्ठ टक्के अक्षरांची होणारी बचत होते. (२) 'एका वर्तुळकंसात आंतरलिखित झालेल्या कोनाचे माप त्या कोनाने आंतरखंडित केलेल्या त्या वर्तुळाच्या कंसाच्या मापाच्या निम्मे असते' हे सोळा शब्द-एक्कावन्न अक्षरी प्रमेय इंग्रजीत 'The measure of an angle inscribed in an arc of a circle is half of the measure of the arc of that circle intercepted by that angle' सव्वीस शब्द, एकशे चार अक्षरी होते. या वाक्यात मराठीमुळे त्रेपन्न टक्के अक्षरांची बचत होते.

ही दोन उदाहरणे अपवाद नसून बहुतेक वाक्यांत अशीच स्थिती आढळते. इंग्रजी टाळून मराठी वापरल्यास चाळीस ते सत्तर टक्के अक्षरांची बचत होते. कोणत्याही विषयाचे इंग्रजी पुस्तकातील कोणत्याही मजकुराचा मराठी अनुवाद करून होणारी बचत स्वत: पडताळून बघता येते.

## प्रधान आणि गौण शब्द

एखादे वाक्य ज्या विषयाशी संबंधित असेल त्या विषयातील पारिभाषिक शब्दांना आपण वाक्यातील प्रधान शब्द म्हणू. व्याकरणाच्या नियमानुसार ते वाक्य पूर्ण होण्यासाठी वापरलेल्या अन्य शब्दांना गौण शब्द मानू. विशिष्ट माहिती देणारे वाक्य कोणत्याही भाषेत तयार केले तर प्रधान शब्दांची संख्या सहसा स्थिर असते. वाक्य वेगवेगळ्या भाषेत रूपांतरित होताना गौण शब्दांची संख्या भाषेनुसार बदलते. मराठी वाक्यात प्रधान शब्द जास्त आणि गौण शब्द फारच कमी, तर इंग्रजी वाक्यात प्रधान शब्द कमी आणि गौण शब्द खूप असतात.

जगातील प्रत्येक व्यक्तीसाठी दिवसाचे तास चोवीसच असतात. वाचणे, बोलणे आणि लिहिणे ह्यांसाठी कमीत कमी वेळ लागावा ही प्रत्येकाची गरज आहे. भारतीय भाषांची जडणघडण करताना प्राचीन भारतातील विद्वानांनी वेळ वाचवण्याला महत्त्व दिले होते, हे वरील निरीक्षणातून दिसून येते. आजकाल जीवनाचा वेग खूपच वाढला असल्याने वेळ वाचवण्याला आजच्या काळात अधिकच महत्त्व आहे. मानवी जीवनातील वेळेचा वापर अधिक कार्यक्षमपणे करण्यासाठी मराठी भाषा फारच उपयुक्त आहे.

## प्रधान आणि गौण शब्दांचे वाक्यातील प्रमाण

इंग्रजी भाषेत विशेष असे तीनशे गौण शब्द आहेत. प्रत्येक इंग्रजी मजकुरात त्यातील शब्दांचा वापर फार मोठ्या प्रमाणात, पुन्हा-पुन्हा आणि सुट्ट्या स्वरूपात करावा लागतो. सुट्ट्या स्वरूपात गौण शब्द वापरून इंग्रजीत जे साध्य होते, तेच मराठीत शब्दांची विविध रूपे करून साध्य होते. मराठीत गौण शब्दांचा वापर सुट्ट्या स्वरूपात आणि मोठ्या प्रमाणात करावा लागत नाही. वाक्याच्या लांबीत यामुळे खूप फरक पडतो. वर उदाहरणांत दिलेल्या पहिल्या मराठी वाक्यात सातपैकी सहा शब्द प्रधान तर एक शब्द गौण आहे. पहिल्या वाक्याच्या इंग्रजी रूपांतरात मात्र पंधरापैकी फक्त सात शब्द प्रधान तर आठ शब्द गौण आहेत. दुसऱ्या मराठी वाक्यात सोळापैकी अकरा शब्द प्रधान तर पाच शब्द गौण आहेत. दुसऱ्या इंग्रजी वाक्यात मात्र सव्वीसपैकी फक्त दहा शब्द प्रधान तर सोळा शब्द गौण आहेत. वाक्याची भाषा बदलली तरी प्रधान शब्दांची संख्या सहसा बदलत नसली, तरी इंग्रजीत मात्र प्रधान शब्दांची संख्याही थोडीशी वाढते.

## मराठी शब्द कळण्यास सोपे

बहुतेक मराठी शब्दांचा अर्थ संबंधित, पूर्वपरिचित मराठी शब्दांवरून समजतो. स्पर्शिका, छेदिका, समद्विभुज, समभुज, अपुष्प, सपुष्प, या शब्दांचे अर्थ स्पर्श, छेद,




अनुक्रमणिका

भुजा, पुष्प, घर या परिचित मराठी शब्दांवरून लगेच, सहज समजतात. यांचे इंग्रजी प्रतिशब्द टँजंट, सिर्कट, आयसोसिलस, इक्विलॅटरल, क्रिप्टोघॅम, फोरेंघॅम, डोमेस्टिक. मात्र  टच, कट, साईड, फ्लॉवर, हाऊस या संबंधित, पूर्वपरिचित इंग्रजी शब्दांवरून सहज समजत नाहीत. पूर्वपरिचित शब्दांनी बनलेल्या अर्थवाही मराठी शब्दांमुळे मराठी मजकूर सहज समजतो, सतत शब्दकोश पहावे लागत नाहीत. पूर्वपरिचित शब्दांवरून इंग्रजी मजकूर सहज समजत नसल्याने  सतत शब्दकोश पाहावे लागतात, वेळ वाया जातो.

**वाक्यरचना मराठीत लवचीक तर इंग्रजीत जखडलेली**

रामाने रावणाला मारले, मारले रामाने रावणाला , रामाने मारले रावणाला, रावणाला रामाने मारले, रावणाला मारले रामाने, मारले रावणाला रामाने या सहा वाक्यांत शब्दांच्या जागा बदलल्या तरी त्यांचा अर्थ सारखाच आहे. याचे इंग्रजी भाषांतर Ram killed Ravan आहे. शब्दांच्या जागा बदलून killed Ram Ravan, killed Ravan Ram, Ravan killed Ram, Ravan Ram killed, Ram Ravan killed ही वाक्ये बनतात. यापैकी चार निरर्थक आणि एक  विरुद्ध अर्थाचे होते. अशाच प्रकारे चार शब्दांची २४, पाच  शब्दांची १२० तर दहा शब्दांची ३,८८,८०० वाक्ये बनतात. शब्दक्रम बराचसा बदलला तरी मराठी  वाक्य अर्थपूर्ण राहून अर्थही तसाच राहतो. शब्दक्रम किंचित बदलला की इंग्रजी वाक्य निरर्थक किंवा विरुद्धार्थी होते.

**लेखन आणि वाचन मराठीत सुसंगत**

सध्या मराठी भाषेसाठी देवनागरी लिपी वापरतात. देवनागरीत १६ स्वर असून जोडाक्षर पद्धत असल्याने स्वतंत्र उच्चाराची १०० कोटीहून अधिक अक्षरचिन्हे निर्माण होतात, त्यापैकी सुमारे २० लाख चिन्हे रोजच्या वापरात आहेत. मराठी शब्द पाहताच त्याचा उच्चार मनात निश्चित होतो. या लिपीमुळे ९९% मानवी उच्चारांचे अचूक लिखाण करता येते. इंग्रजीच्या रोमन लिपीत केवळ पाच स्वर असून जोडाक्षर पद्धत नाही. या त्रुटीमुळे इंग्रजी मजकूर वेगाने वाचता किंवा लिहिता येत नाही. इंग्रजी शब्द आणि त्याचा उच्चार याची संगती लावण्यात फार वेळ वाया जातो.

मराठी ही प्रगत भाषा टाळून आपण जर गणित/विज्ञान शिकण्यासाठी इंग्रजीचा माध्यम म्हणून वापर केला तर वाया जाणारा वेळ कोणीही – अगदी श्रीमती एलिझाबेथ राणीही भरून देणार नाही – हे नक्की! शाळेतील विद्यार्थ्यांना तर वेळेची खूपच टंचाई असल्याने इंग्रजीतून शिकण्याचा हट्ट पालकांनी सोडावा असे माझे सांगणे आहे. फक्त इंग्रजीतून शिकण्याचा अव्यवहार्य प्रयत्न केल्यामुळे विषयाचे पुरेसे आकलन न होणे हा

मोठा धोका आहे. महाराष्ट्रातील सर्व मराठी माध्यम शाळांनी सेमी-इंग्रजीचा पर्याय तातडीने बंद करून गणित/विज्ञान पूर्णपणे मराठीतून शिकवावे असे मी सुचवतो. त्यासोबत या विषयांच्या इंग्रजी पुस्तकांचे माहितीसाठी वाचन करणे एकवेळ उपयुक्त ठरेल, पण सेमी-इंग्रजीचा विचारही करू नये. विद्यार्थ्यांच्या हितासाठी महाराष्ट्रातील सर्व इंग्रजी माध्यम शाळांनी मात्र निम-मराठी पर्याय सुरू करावा. इंग्रजी माध्यम शाळांमधील विद्यार्थ्यांना गणित, विज्ञान, इतिहास, भूगोल, चित्रकला, पर्यावरण, शारीरिक शिक्षण, संगणक हे सर्व विषय इंग्रजीसह मराठीतूनही समजावून द्यावेत असे माझी कळकळीची विनंती आहे. विविध विषय विद्यार्थ्यांना नीट आणि पूर्ण कळणे हीच सर्वात महत्त्वाची बाब मानावी. गणित/ विज्ञान शिक्षणात मराठीतून शिकवण्याला अग्रस्थान द्यावे असे माझे आग्रहाचे निवेदन आहे.

मराठी माध्यम शाळांमधील शिक्षकांनी कृपया सेमी-इंग्रजीला प्रोत्साहन देऊ नये, असे मी आवाहन करतो. चौथी अथवा सातवीला उत्तम गुण मिळवणाऱ्या, चौकस बुद्धीच्या, हुशार, वर्गात उठून पटापट उत्तरे देणाऱ्या कष्टाळू विद्यार्थ्यांना सेमी-इंग्रजी घेण्याचा सल्ला बहुतेक वेळा मराठी माध्यमाच्या शाळेतील शिक्षकांकडूनच मिळतो. विद्यार्थी आणि पालकांनी हा सल्ला मानून सेमी-इंग्रजीचा पर्याय स्वीकारला की, विद्यार्थ्याने वर्गात प्रश्न विचारणे बंद होते, त्याचे गुण कमी होतात, न्यूनगंड निर्माण होतो. भरपूर गुण मिळाले तरच सेमी-इंग्रजी मिळेल असा नियम शाळेने केल्यामुळे सेमी-इंग्रजीला अकारण प्रतिष्ठा प्राप्त होते. सेमी-इंग्रजी घेतल्याने आपण मुलांसाठी काही तरी चांगले केल्याचे समाधान पालकांना वाटू लागते, मात्र प्रत्यक्षात मुलांचे कायमचे नुकसान होते. ज्या शाळांनी सेमी-इंग्रजीच्या तुकड्या मोठ्या प्रमाणात वाढविल्या त्या सर्व शाळांचा निकाल दिवसेंदिवस कमी कमी होत असल्याचे आढळते. मुले मोठी झाल्यावर हे नुकसान सेमी-इंग्रजीमुळे झाले असे मानून त्यांच्या मुलांसाठी पूर्ण इंग्रजी माध्यम निवडतात. या सर्व घटनाक्रमात ज्या मराठी माध्यम शाळांनी मोठ्या कौतुकाने सेमी-इंग्रजीची भलावण केली, त्या मराठी माध्यम शाळेला काही वर्षांनी विद्यार्थी मिळणे अवघड होते, पहिलीच्या प्रवेशासाठी शिक्षकांना दारोदार हिंडावे लागते. मराठी शाळांची दुरवस्था आणि महाराष्ट्राची शैक्षणिक घसरण थांबवण्यासाठी सेमी-इंग्रजीचा पर्याय समूळ नष्ट करणे अत्यंत आवश्यक आहे. सर्व शिक्षकांनी त्यासाठी प्रयत्न करावे, हे आवाहन!

■





अनुक्रमणिका

# सेमी-इंग्रजीचा पर्याय म्हणजे मृगजळच !

गीता जयंत दुवेदी

आमच्या समर्थ शिक्षण संस्थेची धनकवडी येथे समर्थ विद्यालय ह्या नावाने वरिष्ठ प्राथमिक शाळा (इ० पहिली ते इ० सातवी) असून सर्व इयत्तांची प्रत्येकी एकच तुकडी आहे. सर्व तुकड्यांवरील शिक्षकांना वेतन-अनुदान मिळते.

आम्ही मांडत असलेले विचार हे आमच्या अनुभवांशी निगडित असून आठवी ते दहावी ह्या इयत्तांसंदर्भात हे विचार लागू होतील की नाही ह्याची आम्हांला कल्पना नाही.

आमच्या मते मराठी माध्यमाच्या शाळांसाठी सेमी-इंग्रजीचा पर्याय हा सुवर्णमध्य किंवा सुवर्णमृग नसून मृगजळाइतकाच फसवा आहे. त्याची अनेक कारणे आहेत. काही कारणे लेखांवरील प्रतिक्रियांमधून व्यक्त झाली असून त्यांची पुनरुक्ती आम्ही टाळत आहोत. इतर कारणे खालीलप्रमाणे आहेत –

(१) सेमी इंग्रजीमुळे मुलांना लहान वयातच मातृभाषेव्यतिरिक्त इंग्रजीमधून काही विषयांचे आकलन करून घेण्याचा ताण पडतो व ते अशास्त्रीय आहे. विशेषतः ज्या विद्यार्थ्यांच्या घरची परिस्थिती ह्याकरिता प्रतिकूल आहे व अशा विद्यार्थ्यांची संख्या ज्या शाळांमध्ये अधिक आहे त्यांना हा प्रश्न अधिकच भेडसावेल. नवीन नियमानुसार इयत्ता पहिली ते आठवी अनुत्तीर्ण करण्यास परवानगी नाही. अशा स्थितीत तर सेमी-इंग्रजीच्या बाबतीत हा धोका अधिकच संभवतो. आणि इयत्ता आठवीपर्यंत नुसतेच कागदी घोडे नाचवले जाण्याची शक्यता नाकारता येत नाही. सुज्ञांस अधिक सांगणे न लगे.

(२) मराठी माध्यमाच्या प्राथमिक शाळांतील बरेच शिक्षक एच०एस०सी०, डी०एड० असतात व हे शिक्षण त्यांनी पूर्णपणे मराठी माध्यमातून घेतलेले असते. ह्या शिक्षकांकडून काही विषय त्यांनी इंग्रजीत शिकवावेत अशी अपेक्षा करणे हे चुकीचे आणि त्यांच्यावर अन्याय करण्यासारखे आहे. अशा शिक्षकांना ट्रेनिंग वगैरे देऊन तयार करणे हे व्यावहारिकदृष्ट्या अवघड असते. एका ठरावीक वयानंतर, तसेच नोकरीला लागल्यावर आणि प्रापंचिक जबाबदाऱ्या अंगावर पडल्यानंतर कोणतीही नवीन गोष्ट शिकणे फार कमी लोकांना जमते हे व्यावहारिक सत्य आहे. उगाच आदर्शवाद बाळगण्याचे कारण नाही. अशा

स्थितीत ह्या शिक्षकांवर सेमी-इंग्रजीची जबाबदारी टाकल्यास पाट्या टाकणे सुरू होईल ही भीती आहे आणि विद्यार्थ्यांमध्येही घोकंपट्टीचे प्रमाण वाढेल ह्यात शंकाच नाही.

(३) अशा अनेक शाळा आहेत की ज्या शाळांमध्ये प्रत्येक इयत्तेची एकच तुकडी व एकच शिक्षक मंजूर आहे. विद्यार्थी-संख्येचा प्रश्न तर सर्वांनाच भेडसावतो आहे. अशा स्थितीत सेमी-इंग्रजीचा ओढा वाढल्यास अथवा जाणीवपूर्वक वाढवल्यास अशा शाळा विद्यार्थ्यी-संख्येअभावी बंद पडतील आणि मग केवळ मराठीतून शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या मुलांची गैरसोय, कोंडी आणि मुस्कटदाबी होईल. तसेच, विद्यार्थी-संख्येच्या अभावी ह्या शाळांमधील शिक्षक अतिरिक्त ठरल्यास शासकीय स्तरावर वेगळीच समस्या निर्माण होईल.

ज्या शाळांमध्ये दोन किंवा अधिक तुकड्या आहेत तेथेदेखील सेमी-इंग्रजीच्या तुकडीसाठी तेथील विद्यार्थी-संख्या कमी असल्यास सेमी-इंग्रजी नको असलेल्या विद्यार्थ्यांवर व त्यांच्या पालकांवरही सेमी-इंग्रजी घेण्यासाठी दबाव आणला जातो आणि हे अयोग्य आहे.

(४) प्रथम भाषेत (मातृभाषेत) किंवा परिसर-भाषेत शिक्षण घेताना व देताना विविध शैक्षणिक प्रयोग (उदा० नाट्यीकरण/प्रश्नमंजूषा वगैरे) शिक्षकांकडून सहजपणे राबवले जातात. त्यासाठी त्यांना विशेष प्रयत्न करावे लागत नाहीत. त्यामुळे विषय समजण्यास विद्यार्थ्यांना अधिक मदत होते. सेमी-इंग्रजी शिकवताना हे जमणे कठीण आहे, म्हणून अंतिमतः विद्यार्थ्यांचे नुकसानच होईल.

अर्थात, इंग्रजीचे महत्त्व कमी आहे असे आम्हांला म्हणायचे नाही. पूर्वीच्या अनेक पिढ्या अगदी आमच्यासकट इंग्रजी उत्कृष्ट लिहू-वाचू आणि बोलू शकतात. किंबहुना अकरावीनंतर इंग्रजीमध्ये विषय शिकताना बुद्धी अधिक परिपक्व झालेली असते असे आमचे मत आहे.

सध्याचे संगणकाचे युग असले तरी त्यासाठी लागणारे इंग्रजी, कंटेंटच्या दृष्टिकोणातून फार नसते. आणि बहुतेक सर्व गोष्टींसाठी सॉफ्टवेअर्स असल्याने संगणकाचा वापर अतिशय सोपाही झाला आहे. तरीही, सुरुवातीपासूनच इंग्रजी चांगले होण्यासाठी इयत्ता पहिलीपासून इंग्रजी हा भाषाविषय ठेवण्यात आला आहे ते योग्य आहे. हा विषय क्रमाक्रमाने योग्य अभ्यासक्रमाद्वारे आणि अधिक मनोरंजक करून (उदा० इंग्लिश सीडीज, ॲनिमेटेड फिल्म्स दाखवून) शिकवता येईल. तसेच, स्पोकन इंग्लिशसाठीही ताण न पडणारा वेगळा अभ्यासक्रम तयार करता येईल. कोणत्याही

परिस्थितीत सेमी-इंग्रजी हा प्रकार वाढू देणे किंवा शासन-स्तरावर त्याला वाढण्यास उत्तेजन देणे हे अतिशय चुकीचे ठरेल असे आमचे ठाम मत आहे.

विशेषतः आमच्यासारख्या अनेक शाळांतील विद्यार्थी व पालकांची त्यामुळे परवड होईल हे निश्चित.

■

**आपण परकीय अन्नावर वाढू शकणार नाही**

इंग्रजीचं किंवा त्यातील वाङ्मयाचं महत्त्व मी कमी लेखतो असा गैरसमज कुणी करून घेऊ नये. हरिजनमधील माझं लिखाण म्हणजे इंग्रजीवरील माझ्या लोभाचे परिणाम आहेत. पण इंग्लंडमधील हवामान आणि सृष्टिसौंदर्य ह्यांचा भारताला जेव्हा उपयोग आहे त्याच्यापेक्षा अधिक उपयोग तिच्या वाङ्मयीन सौंदर्याचा नाही. भारताचा विकास आपल्या स्वतःच्याच वातावरणात आणि सृष्टीत आणि स्वतःच्याच वाङ्मयात व्हायला हवा. मग ती इंग्रजी वातावरण, सृष्टी आणि वाङ्मय ह्यांहून निकृष्ट असली तरी हरकत नाही. आपण आणि आपली मुलं ह्यांचा विकास आपल्या परंपरेतच व्हायला हवा. आपण जर उसनं घेऊन आलो, तर आपण स्वतःचंच दारिद्र्य वाढवू. आपण परकीय अन्नावर वाढू शकणार नाही. राष्ट्राचा विकास राष्ट्राच्या वाङ्मयीन संपत्तीवरच आणि भाषांतच व्हायला हवा, असं माझं म्हणणं आहे. रवींद्रांची अजोड निर्मिती समजण्याकरता मला बंगाली शिकण्याची गरज नाही. उत्कृष्ट भाषांतराच्या साहाय्यानं ती मी समजून घेऊ शकतो. टॉलस्टॉयच्या गोष्टी समजण्याकरता गुजराती मुलामुलींनी रशियन शिकण्याची गरज नाही. त्यांना त्या भाषांतरावरून कळू शकतील. जगातील उत्कृष्ट वाङ्मयाचा आस्वाद आम्हांला ग्रंथांच्या प्रसिद्धीपासून आठवड्याच्या आत मिळू शकतो, असा इंग्रजांना सार्थ अभिमान आहे. मग शेक्सपीयर आणि मिल्टन ह्यांच्या उत्तम वाङ्मयाकरता मी तरी इंग्रजी का शिकावं?

('हरिजन', दि० ९ जुलै १९३८)





अनुक्रमणिका

# सेमी-इंग्लिश शिक्षणाचे माध्यम असावे का?

व०सी० देशपांडे

## १. प्रस्तावना

शिक्षणाचे माध्यम निश्चित करणे ही वरवर वाटते तेवढी सोपी प्रक्रिया नाही, हे जगभरातील अनेक देशांच्या अनुभवांवरून स्पष्ट झाले आहे आणि दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र झालेल्या देशांबाबत आढळून आले आहे. सोविएत युनियनच्या विघटनानंतर स्वतंत्र झालेल्या देशांसमोरील प्रश्नांवरूनही हे दिसून आले आहे. आपण तर अनेक दशके ते अनुभवतो आहोतच, पण आता त्यासंबंधी आपण अधिक गांभीर्याने विचार करण्याची वेळ आली आहे कारण आपणाकडे घाईघाईने माध्यमासंदर्भात निर्णय घेतले जात आहेत. ज्यांच्या हितासाठी ते घेतले जात आहेत त्यांचे या निर्णयामुळे अहितच घडणार आहे हे अनेक जणांच्या लक्षात येत नाहीये. माध्यमासंबंधीचे धोरण ठरविताना त्यात राजकीय, सामाजिक, आणि आर्थिक प्रक्रिया कार्यरत झालेल्या दिसतात. पण माध्यमनिश्चिती ज्या शैक्षणिक प्रक्रियेचा हा अंतर्गत भाग आहे त्या शिक्षण प्रक्रियेचा मात्र विसर पडलेला दिसतो. शिक्षणक्षेत्रात अनेक वर्षे सातत्याने काम करणारा एक कार्यकर्ता म्हणून या संबंधी माझे विचार मला आपणांसमोर मांडायचे आहेत. पण तत्पूर्वी माध्यमाच्या निर्णयावर ज्या अन्य प्रक्रिया प्रभाव टाकत असतात त्यांच्याकडे आपले लक्ष वेधावयाचे आहे.

## २. राजकीय प्रक्रियेचा प्रभाव

इंग्लिश आक्रमकांनी एकोणिसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकापर्यंत या देशातील मोठा भूभाग आपल्या अधिपत्याखाली आणला होता. इथल्या लोकांच्या साहाय्यानेच एतद्देशीयांवर राज्य चालविणे अपरिहार्य आहे हेही त्यांनी जाणले होते. म्हणूनच त्यांना 'वंशाने भारतीय पण भाषा, विचार आणि संस्कारांनी इंग्लिश असणारे' सेवक निर्माण करणारे शिक्षण देण्याची जबाबदारी उचलण्याचे त्यांनी ठरविले. यासाठी १८५४च्या वुड्च्या खलित्यानुसार शिक्षण समाजाच्या सर्व थरांतील लोकांना खुले केले गेले. प्राथमिक आणि उच्चशिक्षणाबरोबरच माध्यमिक शिक्षणाचा शिक्षणव्यवस्थेत समावेश करण्यात आला. सरकारी शाळांबरोबरच ख्रिस्ती मिशनरी आणि स्थानिकांनी काढलेल्या चांगल्या शाळांना अनुदान देण्याची सोय करण्यात आली. विद्यार्थ्यांची मातृभाषा आणि इंग्लिश अशा दोनही माध्यमांची सोय करण्यात आली. सरकारी नोकरीसाठी इंग्लिशच्या

चांगल्या ज्ञानाची अट घालण्यात आली. तसेच उच्च शिक्षणासाठी इंग्लिशची माध्यम म्हणून निवड करण्यात आली. या राजकीय निर्णयाने भारतीयांच्या मनात इंग्लिश ही अर्थार्जनाची आणि ज्ञानार्जनाची श्रेष्ठ भाषा म्हणून जो गंड निर्माण झाला आहे तो आजच्या जागतिकरणाच्या जमान्यातही कायम आहे! वास्तव परिस्थिती पाहता आज इंग्लिशव्यतिरिक्त अन्य भाषांतून व्यवहार चालणाऱ्या देशांबरोबरदेखील व्यवहाराची अनेक दालने भारतीयांना खुली झाली आहेत. आपले तरुण त्या भाषा शिकले तर त्यांना अर्थार्जनाच्या अनेक संधी उपलब्ध होतील, तसेच त्या त्या भाषांतील ज्ञानही त्यांना आणि त्यांच्याद्वारे अन्य भारतीयांना उपलब्ध होईल. पण लक्षातही येत नाहीत इतक्या कमी प्रमाणात तसे प्रयत्न चालू आहेत. या उलट इंग्लिश ही शिक्षणाच्या माध्यमाची भाषा असलेल्या अमेरिकेत हे प्रयत्न विसाव्या शतकाच्या द्वितीयार्धापासून सुरू झाले होते. आपल्या तरुणांनी विविध देश, भाषा, आणि संस्कृती यांचा अभ्यास करावा यासाठी त्या देशाने अनेक उपक्रम होती घेतले. अशा विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देणे, त्यांच्या अनुभवांवर चर्चासत्रे आयोजित करणे, संशोधन प्रकल्प सुरू करणे, एवढेच नव्हे तर असे विद्यार्थी तयार व्हावेत म्हणून अध्यापक शिक्षणाचे तत्संबंधी शिक्षणक्रम सुरू करणे इत्यादी.

आपल्याला राजकीय स्वातंत्र्य मिळून ६५ वर्षे उलटली, एकविसाव्या शतकाचे पहिले दशकही उलटले, पण एकोणिसाव्या शतकात परकीय राज्यकर्त्यांनी घेतलेले शिक्षणाच्या माध्यमासंबंधीचे निर्णय बदलण्याची राजकीय इच्छाशक्ती आपण दाखवू शकलेलो नाही ही वस्तुस्थिती आहे. मलेशियाने हे केवळ २६ वर्षांत साध्य करून दाखविले होते.

**३. सामाजिक -आर्थिक प्रक्रियांचा प्रभाव**

ब्रिटिशांच्या राज्यात शतकानुशतके शिक्षणापासून वंचित राहिलेल्या भारतीय समाजघटकांना पहिल्याप्रथम शिक्षणाची द्वारे खुली झाली. मानवतावादी समाजसुधारक आणि दूरदृष्टीचे शिक्षणप्रसारक यांच्या अथक प्रयत्नांचा आणि मार्गदर्शनाचा लाभ झाल्यामुळे बहुजनसमाजात आणि सर्व स्तरांतील स्त्रीवर्गात अभूतपूर्व जागृती निर्माण झाली. १९५० साली स्वतंत्र भारताची राज्यघटना अस्तित्वात आली आणि या समाजघटकांना केवळ शिक्षणाचे आणि अर्थार्जनाचे समान हक्क मिळाले असे नाही, तर आरक्षण, शिष्यवृत्त्या यांसारख्या सकारात्मक उपायांचेही साहाय्य मिळाले. त्यामुळे साहजिकच अनेकांना आपले शिक्षण पुरे करता आले. याचे महत्त्वाचे दोन परिणाम आपल्याला पाहावयाला मिळाले. एक म्हणजे अर्थार्जनाच्या अनेक संधी त्यांना उपलब्ध





अनुक्रमणिका

झाल्या आणि त्याहीपेक्षा मोठा परिणाम म्हणजे त्यांच्यात अस्मिता जागृती झाली. संधी मिळाली तर आपणही इतरांबरोबरीने काम करू शकू, आपल्या ठिकाणचे सुप्त गुण प्रकट करू शकू असा आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणी निर्माण झाला आणि तशी उदाहरणेसुद्धा दिसू लागली. महाराष्ट्राचे उदाहरण पाहिले तर काय दिसते? संधी प्राप्त झाल्यामुळे समाजात बदल वेगाने घडू लागले, इतके वर्ष मागे राहिलेले समाजघटक पुढे येण्याचे मार्ग शोधू लागले. शिक्षणाचे अनुभवलेले सामर्थ्य आणि लोकशाहीने संघटनाद्वारे सत्तेचा दाखविलेला मार्ग यामुळे बहुजन समाजातील आघाडीवर असलेल्या घटकांनी राज्याची सत्ता मिळविली, नवी सत्तास्थाने निर्माण केली आणि त्यांच्या घरी सुबत्ता नांदू लागली. १९७०नंतर ज्यांच्या हातून सत्ता गेली होती त्यांनी आपल्या समायोजनाचे नवे मार्ग शोधले. नव्याने स्थापन होऊ लागलेल्या कारखानदारीसाठी आवश्यक असलेल्या प्रथम व द्वितीय स्तरासाठीचे मनुष्यबळ या समाजघटकातून मिळू लागले. त्यांनी रुळविलेल्या मार्गावरून अन्य समाजघटकांतील सुशिक्षित तरुण चालू लागले आपल्या अंगभूत गुणांनी पुढे जाऊ लागले. केवळ देशातच नव्हे तर परदेशांतही अशा सुशिक्षित आणि प्रशिक्षित मनुष्य बळाला संधी मिळू लागल्या. त्यातही ज्यांचे इंग्लिश माध्यमातून शिक्षण झाले आहे त्यांना अधिक संधी मिळतात अशी समजूत मूळ धरू लागली आणि मग इंग्लिश माध्यम असलेल्या शाळांची संख्या वाढू लागली. नव्वदचे दशक उजाडले आणि जागतिकीकरणाचा प्रभाव दिसू लागला. संगणक-संप्रेषण तंत्रज्ञानाने तर सर्व स्तरांवर अनेकानेक संधी उपलब्ध होऊ लागल्या आणि त्यापाठोपाठ इंग्लिश माध्यमांच्या शाळांची संख्याही वाढू लागली. हे सारे बदल पाहणाऱ्या अन्य समाज घटकांच्या पालकांमध्ये असा समज दृढ होऊ लागला की ऐहिक प्रगती करून घेण्याचा एकमेव मार्ग म्हणजे मुलांना इंग्लिश माध्यमाच्या शाळांत घालावयाचे. पण त्या शाळांमध्ये प्रवेश मिळविणे धनिकांच्या मुलांनाच शक्य होते. ज्या शाळांतील ही मुले इंग्लिश माध्यमाच्या शाळांकडे वळत होती, त्या शाळांनी गणित आणि विज्ञान इंग्लिशमध्ये शिकविण्याची सोय करून तो ओघ थोपविण्याचा प्रयत्न सुरू केला. या शाळांतीलसुद्धा शुल्क भरणे ज्या पालकांना अवघड होते अशांनी आपल्या मुलांची नोंदणी स्थानिक स्वराज्य संस्थांनी चालविलेल्या शाळांत केली होती. मुलांचे चौथीपर्यंत शिक्षण झाल्यावर काही पालकांनी आपली मुले इंग्लिश माध्यमाच्या शाळांत दाखल करून घ्यायला सुरुवात केली होती. अशा परिस्थितीत आहेत त्या विद्यार्थ्यांना टिकवून ठेवण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनीही इंग्लिश माध्यमाची आणि ते जमले नाही तर सेमी-इंग्लिश माध्यमाची सोय करायला सुरुवात केली. अशा प्रकारे सामाजिक प्रक्रियांच्या प्रभावाने वाढत चाललेल्या सेमी-इंग्लिश माध्यमाच्या शाळांच्या संख्येकडे

पाहून काही जणांना वाटू लागले की आपल्या राज्यात एक शांततापूर्ण क्रांती घडते आहे. क्रांती ही नेहमी अचानक घडलेली दिसते, पण प्रत्यक्षात ती काही विचारवंतांच्या प्रेरणेतून आणि कृतिवीरांच्या अथक प्रयत्नांतून निर्माण होते. तसे काही इथे झालेले नाही!

**४. प्रभावहीन शिक्षणव्यवस्था**

स्वातंत्र्यानंतर राष्ट्रीय आणि राज्यपातळीवर शैक्षणिक पुनर्रचनेसाठी अनेक आयोग आणि समित्या नेमल्या गेल्या, १९६८ आणि १९८६ची (१९९२ पुनर्रचित) राष्ट्रीय शैक्षणिक धोरणे प्रसिद्ध झाली, पण व्यवहारात मात्र एकोणिसाव्या शतकात ब्रिटिशांनी रुजविलेली शिक्षणपद्धती आणि शिक्षणव्यवस्थाच चालू राहिली! आजही सेवेसाठी मनुष्यबळ निर्माण करण्याचे काम या व्यवस्थेमार्फत इमाने इतबारे चालू आहे. त्यासाठी अपेक्षित वर्तन दाखविणाऱ्या परीक्षार्थींची निवड करणारी व्यवस्था आजही चालूच आहे. लक्षावधी विद्यार्थी पात्रतेची प्रमाणपत्रे घेऊन बाहेर पडत आहेत आणि लक्षावधी मस्तकांवर नापासीचा तप्त शिक्का उमटतो आहे. या परीक्षापद्धतीत बदल होण्याची नुसती चाहूल लागली तरी क्षणाचाही विलंब न लावता तज्ज्ञ आपला मौलिक निषेध व्यक्त करताहेत आणि टीआरपीची आस लागलेल्या माध्यमांनी दिलेल्या भडक मथळ्यांना घाबरून पालक आपल्या मुलांच्या भविष्यात अंधार पसरणार या भीतीने कासावीस होताहेत. याच माध्यमाद्वारे या बदलाचा अर्थ स्पष्ट करणारे माजी कुलगुरू वाघमारे यांच्यासारख्यांचे लेख मात्र दुर्लक्षित राहताहेत. राष्ट्रीय पातळीवर लगेच यावर पुनर्विचार करणारी शिक्षणमंत्र्यांची समिती स्थापन केली जात आहे. उद्या हे प्रागतिक पाऊल मागे घेतले गेले तर कुणाला आश्चर्य वाटणार नाही. कारण शिक्षणव्यवस्थेला योग्य शैक्षणिक निर्णयांबाबत आपला प्रभाव पाडता आलेला नाही. कोठारी आयोगाच्या (१९६४-६६) अहवालातील मातृभाषेतून शिक्षण, त्रिभाषासूत्री आणि परिसरातील शाळा यांसारख्या मौलिक संबोधांची अंमलबजावणी झाली असती तर आज माध्यमासंबंधात निर्माण झालेली गोंधळाची परिस्थिती पाहावयास लागली नसती आणि त्याद्वारे पुढच्या पिढ्यांचे होऊ घातलेले नुकसान टळले असते. पण कोणत्याही चांगल्या कल्पनांची आणि योजनांची अर्धवट अंमलबजावणी करण्याची या व्यवस्थेला जणू सवयच झाली आहे. १९६०च्या दशकातील मूल्यमापन संबोधापासून ते २००९च्या मुलांच्या शिक्षणाच्या हक्कासंबंधीच्या कायद्यापर्यंत अशी अनेक उदाहरणे आपल्याला पाहावयास सापडतील. याची महत्त्वाची दोन कारणे आहेत. एक म्हणजे ही शिक्षणव्यवस्था कोणतीही नवोपाययोजना पथदर्शी पद्धतीने पडताळून न पाहताच एकदम आणि एकाच वेळी सर्व देशभर लागू करते. ना त्यासंबंधी शिक्षकांचे नीट

प्रशिक्षण होत, ना अंमलबजावणीच्या वेळी योग्य पर्यवेक्षण होत, ना मार्गदर्शन मिळत. दुसरे कारण म्हणजे आपली शिक्षण व्यवस्था केंद्रानुयायी आहे. राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण संस्था राष्ट्रीय शालेय अभ्यासक्रम आराखडा तयार करते आणि राज्ये त्यात किरकोळ बदल करून अथवा जसाच्या तसा तो स्वीकारतात. तीच रीत राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषद अध्यापक शिक्षणाच्या अभ्यासक्रमांबाबत अनुसरताना दिसते. देशाला राजकीय स्वातंत्र्य मिळूनही राज्यांनादेखील वेगळा विचार करण्याची परवानगी नाही तर शैक्षणिक संस्थांना ती कुठून असणार? ज्या शिक्षण व्यवस्थेत विचार आणि आचार स्वातंत्र्याला स्थान नाही तिच्यात आपले निर्णय आपण घेण्याचे सामर्थ्य कसे निर्माण होणार आणि तिचा प्रभाव तरी कसा पडणार? परिस्थितीशरण बनून इतरांच्या निर्णयाशी जुळवून घेत टिकून राहणे एवढेच तिच्याकडून घडणार!

वर २ ते ४ मुद्द्यांमध्ये वर्णन केलेल्या राजकीय-सामाजिक-आर्थिक प्रक्रियांचा प्रभाव आणि गतानुगतिक निष्प्रभ शिक्षणव्यवस्था यांच्यामुळे इंग्लिश आणि सेमी-इंग्लिश शाळांची संख्या भरमसाठ वाढली आणि या शाळांत मुलाला-मुलीला दाखल केले की आपण त्याच्या-तिच्या कल्याणाची तरतूद केली असा भ्रम पालकांच्या ठिकाणी निर्माण झाला. प्रत्यक्ष परिणाम मात्र विपरीत होताहेत. कसे ते आपण आता पाहू या.

**५. मातृभाषेतर माध्यमातून चालणारे शिक्षण**

मातृभाषेतून शिक्षण घेणारा विद्यार्थी शाळेत येण्यापूर्वी पाच वर्षे ती भाषा ऐकत आणि बोलत असतो. त्यामुळे त्या भाषेतील २०००वर भाषणशब्दसंपत्ती त्याच्याजवळ तयार असते आणि त्या भाषेचे कार्यात्मक व्याकरण त्याने आत्मसात केलेले असते. या उलट मातृभाषेतर माध्यमातील शाळेत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्याकडे त्या भाषेतील जवळपास शून्य शब्दसंपत्ती असते. त्या भाषेतून ऐकणे आणि बोलणे जेथे अशक्य असते तेथे कार्यात्मक व्याकरणाच्या ज्ञानाची अपेक्षा कशी करणार? अशा विद्यार्थ्याला वर्गात आल्यावर पहिली जाणीव होते ती आपल्या अज्ञानाची, अपुरेपणाची. हा न्यूनगंड बरोबर घेऊनच त्याची शिक्षणाची वाटचाल सुरू होते. मूल शिकते असे आपण म्हणतो तेव्हा काय घडते, ते पियाजे या बालमानसशास्त्रज्ञांनी सांगितले आहे. ते म्हणतात की सामोरे येणाऱ्या नव्या अनुभवांचा अर्थ मूल जुन्या अनुभवांच्या आधारे लावत असते आणि त्यातून त्याचे ज्ञान जन्माला येत असते. हे घडताना सवंगडी अथवा अन्य व्यक्ती तसेच मातृभाषा यांचा मुलांना खूप उपयोग होतो, असे दुसरे बालमानसशास्त्रज्ञ वायगॉटस्की म्हणतात. तिसरे मानसशास्त्रज्ञ ब्रूनर म्हणतात की मुले इंद्रियांच्या




अनुक्रमणिका

साहाय्याने माहिती मिळवितात. अनेक उदाहरणांच्या द्वारे जे ज्ञान प्रत्यक्षात मिळवितात त्यांचे पृथक्करण झाल्यावर मुलांच्या मनात त्यांचे संबोध तयार होतात. पुढे या संबोधांच्या मदतीने ते दुसऱ्या अनुभवांचा अर्थ लावू शकतात, त्यातून आणखी संबोध तयार होतात. या संबोधांच्या आधारे मुले व्यक्ती, प्राणी, वस्तू यांच्या अनुपस्थितीतही विचार करू शकतात, कल्पना करू शकतात, तुलना करू शकतात, निष्कर्ष काढू शकतात आणि भराभर प्रगती करतात. समस्यांनी बेजार झालेल्या आणि स्पर्धात्मक वातावरणात जगणाऱ्या एकविसाव्या शतकातील नागरिकांना आवश्यक असलेली ही बौद्धिक कौशल्ये आहेत. पण मातृभाषेतून शिक्षण न घेणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये मात्र त्याबाबत कमतरता निर्माण होणार आहे. मातृभाषेतर माध्यमाच्या शाळांतून शिकणाऱ्या मुलांच्या बाबतीत संबोधनिर्मितीची ही नैसर्गिक प्रक्रिया घडत नाही. कारण त्यांनी मोठे होताना घेतलेल्या अनुभवांना दिलेले संबोध रूप हे त्यांच्या मातृभाषेतील संज्ञांचे असते. या संज्ञांच्या आधारेच ते विविध उच्चतर मानसिक प्रक्रियांचा उपयोग करण्याची शक्यता असते. परंतु अन्य भाषेतून चालणाऱ्या शिक्षणात या संज्ञांचा क्वचितच उपयोग केला जातो. मुलांशी बोलल्या जाणाऱ्या त्या भाषेतील शब्द त्यांना अपरिचित असतात. त्या संज्ञा ज्या संबोधांचा निर्देश करतात, ते संबोध स्वानुभवातून शिकलेले नसल्यामुळे त्यांना समजायला अवघड जातात. शिक्षक चित्रे, कृती अथवा स्पष्टीकरणाच्या मदतीने ते संबोध समजावून देण्याचा जरूर प्रयत्न करतात. पण त्यासाठी उपयोगात आणलेली उदाहरणे मुलांच्या अनुभवांतील असतातच असे नाही. जेव्हा शिक्षकांना मुलांच्या अनुभवांचा आणि ते ज्या परिसरात घेतलेले असतात त्या परिसराचा परिचय असतो तेव्हाच अशी उदाहरणे ते देऊ शकतात. पुन्हा त्यासाठी एकाच परिसरातून आलेली मुले वर्गात असावी लागतात आणि शिक्षकांचे माध्यम भाषेवर पूर्ण प्रभुत्व असावे लागते. केवळ मागणी आहे म्हणून घाईघाईने काढण्यात आलेल्या शाळांत अशा शिक्षकांचा अभाव असतो ही वस्तुस्थिती आहे. या सगळ्याचा विचार करता मुलांचे शिकणे किती अवघड होऊन बसते याची आपण कल्पना करू शकतो. त्यावर उपाय केला जातो तो पाठांतराचा. बऱ्याचवेळा हे पाठांतर अर्थहीन बनते आणि पुढील शिक्षणात अधिक अडथळे निर्माण होतात. ते अडथळे दूर करण्यासाठी पालकांना वेळ काढावा लागतो. सुशिक्षित पालकांपैकी केवळ काही जणांनाच हे जमते. उरलेल्यांपैकी काहीजण शिकवण्या वगैरे सोय करून मुलांच्या अडचणी दूर करतात. अशी मुले पुढचे शिक्षण घेऊ शकतात. अशिक्षित आणि गरीब पालकांच्या मुलांना अशी मदत मिळू शकत नाही. त्यामुळे असे विद्यार्थी मागे पडू लागतात. वाढत्या इयत्तांबरोबर त्यांच्या अडचणींचे डोंगर अधिकाधिक मोठे होतात, काही वेळातर तर ते ओलांडणे अशक्य बनते. असे





अनुक्रमणिका

विद्यार्थी मग अनुत्तीर्ण होतात आणि शाळा सोडून देतात. त्यांच्या या परिस्थितीजन्य अपयशातून पुढील आयुष्यातील समायोजन कठीण होऊन बसते. हेच विद्यार्थी मातृभाषेतून शिकले असते तर त्यांच्यावर ही पाळी आली नसती हे नक्की.

**६. सेमी-इंग्लिश माध्यमातून चालणारे शिक्षण**

सेमी-इंग्लिश माध्यमाची सोय दोन कारणांनी झालेली दिसते. एक म्हणजे विद्यार्थी गणित आणि विज्ञान हे विषय इंग्लिश मधून शिकले तर त्यांना पुढील अभ्यासक्रम शिकणे सोपे जाईल असे काहीजणांचे म्हणणे आहे. दुसरे म्हणजे इंग्लिश माध्यमाची शाळा काढता येत नाही तर सेमी-इंग्लिश माध्यमाची सोय करू आणि शाळा सोडून जाणारा लोंढा थांबवू असा संबंधित व्यक्तींचा विचार असतो. दुसरे कारण अशैक्षणिक आहे हे लगेचच लक्षात येते. पण पहिले कारणही शैक्षणिकदृष्ट्या सयुक्तिक नाही. मातृभाषेतर माध्यमाच्या संदर्भात दाखवून दिल्याप्रमाणे इंग्लिश माध्यमाच्या शाळांतील विद्यार्थ्यांना संबोध निर्मितीमध्ये अडचणी येतात. त्यांच्यापेक्षाही सेमी-इंग्लिश घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या अडचणी मोठ्या असतात. कारण इंग्लिश माध्यमाच्या विद्यार्थ्यांच्या कानांवर जेवढे इंग्लिश पडते तेवढे देखील सेमी-इंग्लिश माध्यमाच्या विद्यार्थ्यांच्या वाट्याला येत नाही. त्यामुळे गणित आणि विज्ञानातले संबोध समजणे त्यांना अधिकच अवघड जाते. मग उरते ते पाठांतर! ते मात्र चोख होते आणि स्मरणावर आधारेल्या परीक्षांत हमखास यशही मिळवून देते. पण संबोधांच्या अपुऱ्या ज्ञानामुळे पुढील अभ्यासक्रमात अडचणी येतात याकडे कुणाचे फारसे लक्ष जात नाही. आपल्या विद्यार्थ्यांना गणित आणि विज्ञानातले संबोध चांगल्याप्रकारे समजायला हवे असतील आणि त्यांचे पुढील शिक्षण अधिक चांगले व्हायला हवे असेल तर सेमी-इंग्लिशमधून शिक्षण देणे थांबायलाच हवे.

**७. समारोप**

ब्रिटिशांनी आपल्या शिक्षणव्यवस्थेतून भारतीयांच्या मनात इंग्लिश ही अर्थ आणि ज्ञान प्राप्त करून देणारी भाषा आहे हा निर्माण केलेला ग्रह आजही आपल्या मनात कायम आहे. त्यांनी सर्वांना शिक्षण खुले करून दिले आणि स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेने शिक्षणापासून वर्षानुवर्षे वंचित राहिलेल्यांना सवलती दिल्या. त्यामुळे आपल्या समाजात अभिसरण-प्रक्रिया सुरू झाली. पारंपरिक आस्थापनांबरोबरच कारखान्यांतील नोकऱ्या सर्वांना खुल्या झाल्या. त्यात भर पडली ती जागतिकीकरण आणि संगणक-संप्रेषण तंत्रज्ञानक्षेत्रातील संधींची. यांपैकी बहुतेक ठिकाणी इंग्लिशची असलेली आवश्यकता आणि मिळणारी ऐहिक सुखे पाहून दोहोंची सांगड लोकांच्या

मनात बसली. याचा दृश्य परिणाम म्हणून इंग्लिश माध्यमाच्या शाळांची मागणी वाढली. ज्यांना इंग्लिश माध्यम असलेल्या शाळा काढणे शक्य नव्हते त्यांनी सेमी-इंग्लिश माध्यमाचा पर्याय काढला. अंधानुकरणातून समाजाच्या सर्व स्तरांतील पालकांनी आपल्या मुलांना यांपैकी मिळेल तेथे प्रवेश मिळविला.

हे सारे घडताना मुलांच्या होणाऱ्या नुकसानाकडे कुणी लक्ष दिले नाही. शिक्षणात तपशील, संज्ञा यांपेक्षा संबोधांना अधिक महत्त्व असते ते आत्मसात होताना त्या विषयाचे मूलभूत ज्ञान तर होतेच पण उच्च बौद्धिक कौशल्येही निर्माण होतात. पण मातृभाषेतर माध्यमाच्या बहुसंख्य शाळांत हे शक्य होत नाही, तसेच किंवा त्याहीपेक्षा सेमी-इंग्लिश माध्यम असणाऱ्या वर्गात कठीण जाते आणि विद्यार्थ्यांच्या पदरात अपयश पडते, त्यांचे भवितव्य अंधारी बनते म्हणून सेमी-इंग्लिश माध्यमाचा भूलभुलैया ताबडतोब थांबवायला हवा.

■

**नकला करणाऱ्यांची जात निर्माण करून कोणताही देश राष्ट्र होऊ शकत नाही**

ज्या पद्धतीनं इंग्रजीचं शिक्षण दिलं जात आहे, त्या पद्धतीमुळे आपल्या आंग्लशिक्षितांना दुर्बळ बनवलं आहे, असं माझं ठाम मत आहे. ब्रिटिशांबरोबरच्या संबंधांतील सर्वात दुःखद प्रकरण म्हणजे देशी भाषांची हकालपट्टी करण्याची प्रक्रिया. इंग्रजीत विचार करण्याचा आणि आपले विचार मुख्यतः इंग्रजीतच व्यक्त करण्याचा अडथळा नसता तर राजा राममोहन राय हे अधिक मोठे समाजसुधारक झाले असते. टिळक अधिक मोठे विद्वान झाले असते. त्यांचा लोकांवरील प्रभाव अत्यंत विलक्षण होता, ह्यात शंका नाही. पण ते जर अनैसर्गिक पद्धतीनं वाढले नसते तर तो प्रभाव अधिक राहिला असता. इंग्रजी वाङ्मयातील प्रचंड भांडारामुळे त्यांचं ज्ञान वाढलं ह्यात शंका नाही. पण ते त्यांना स्वतःच्या भाषेत उपलब्ध करून द्यायला हवं होतं. नकला करणाऱ्यांची जात निर्माण करून कोणताही देश राष्ट्र होऊ शकत नाही.

('यंग इंडिया', दि० २७ एप्रिल १९२९)





अनुक्रमणिका

# शाळा ते महाविद्यालय यातला भाषिक पूल

**विद्या पटवर्धन**

## भूमिका

स्वभाषेच्या माध्यमातून आणि आजूबाजूच्या पर्यावरणातून मूल शिकतं, तेव्हाच शिक्षण सहजपणे घडतं. जे शिकलं ते व्यक्तिमत्त्वाचा अविभाज्य भाग बनतं. म्हणून अक्षरनंदननं मुलांच्या शिक्षणाचं भाषा माध्यम हे मराठीच असेल अशी ठाम भूमिका घेतली.

शाळेचं भाषिक धोरण ठरवताना भाषातज्ज्ञ डॉ० अशोक केळकर ह्यांच्याशी झालेल्या चर्चेतून भाषा शिक्षणाचं सूत्र हाती लागलं. 'सहा-सात वर्षांचं होईपर्यंत कानांवर कितीही भाषा पडल्या तरी कोणताही गोंधळ न होता मूल त्यातील शब्द, वाक्यरचना, उच्चार अशा त्या त्या भाषेच्या धाटणीसह त्या भाषा सहज उचलू शकतं. सभोवताली ती भाषा बोलण्यासाठी स्वाभाविक अशी परिस्थिती लाभल्यास मूल त्या भाषा बोलूही शकतं. मात्र ज्या टप्प्यावर मूल वाचन-लेखन औपचारिकरित्या शिकतं तेव्हा एका वेळेस एकच भाषा शिकणं उचित ठरतं. शालेय शिक्षणाचं माध्यम म्हणून ज्या सामाजिक, सांस्कृतिक परिवेशात मूल वाढत असतं ती परिसर भाषाच निवडणं योग्य ठरतं.'

त्यानुसार शाळेत राष्ट्रभाषा हिंदी आणि 'जगाची खिडकी' असलेली इंग्रजी या भाषांची ओळख गाणी - गोष्टी - चित्रांच्या माध्यमातून बालगटापासूनच होते. परंतु या भाषांचे औपचारिक शिक्षण मात्र मराठीचा पाया स्थिर झाल्यावरच दिलं जातं. साधारणत: इयत्ता दुसरीपर्यंत बहुसंख्य मुलं मराठीच्या वाचन-लेखनात स्थिरता मिळवतात. त्यानंतर तिसरीपासून इंग्रजीचं शिक्षण औपचारिकरित्या सुरू होतं. हिंदीसारखी सांस्कृतिकदृष्ट्या जवळची भाषा, लिपीही सारखी असल्यानं मुलं अधिक सहजी शिकतात असंही आढळतं.

त्या त्या भाषेच्या तासाला शिक्षक मुलांशी त्या भाषेतूनच बोलण्याचा प्रयत्न करतात. मुलांच्या अनुभवातून आलेल्या त्या भाषेतल्या शब्दांपासून सुरुवात करून हळूहळू भाषेच्या रचनेपर्यंत आणि सौंदर्यापर्यंत मुलांना नेण्याचा प्रयत्न असतो.

भाषाशिक्षणासंदर्भात एक अतिशय महत्त्वाचा मुद्दा लक्षात घ्यायला हवा. मुलाच्या मनात सकसपणे भाषा रुजायची असेल तर त्या भाषेतील साहित्याशी त्यांचा

संपर्क यायला हवा. साहित्याच्या माध्यमातून त्या भाषेत विकसित झालेल्या संस्कृतीचा परिचय होतो आणि त्यामुळेच खऱ्या अर्थानं त्या भाषेत रुजणं शक्य होतं. चांगलं भाषाशिक्षण हे ती भाषा बोलली जाणार्यात सामाजिक, सांस्कृतिक परिसराशी जोडणारं असतं.

एखाद्या भाषेमध्ये रुजणं जेवढं महत्त्वाचं आहे तेवढंच रुतलेलं नसणंही महत्त्वाचं आहे. मराठीचं समीकरण जेव्हा संकुचित अस्मितेशी घातलं जातं तेव्हा भाषेबरोबरच दृष्टिकोनही संकुचित होतात. असं 'रुतलेलं असणं' विकासाच्या दृष्टीनं बाधक आहे. त्यामुळे खऱ्या अर्थानं वैश्विकतेची जाणीव जोपासणारी मनं जर तयार व्हायची असतील तर त्यांची पाळंमुळं इथल्या मातीत रुजायला हवीत.

त्याचबरोबर इंग्रजीसंदर्भात आपली भूमिका काय आहे हेही तपासून बघायला हवं. नव्वदच्या दशकानंतर 'इंग्रजी' ही उच्चशिक्षण, व्यवसाय आणि यातून मिळणाऱ्या व आर्थिक सुबत्तेवर आधारलेली जीवनशैली यासाठीचा जणू काही 'पासपोर्ट' बनली आहे. इंग्रजी शिकणं अनिवार्य आहे हे जरी मानलं तरी कोणत्या वृत्तीतून आपण इंग्रजी शिकतो आहोत हे महत्त्वाचं आहे.

जुलै २००३च्या 'लोकवाङ्मय वृत्त'मध्ये समाजशास्त्रज्ञ पार्थ चटर्जी यांनी म्हटलं होतं, ''तेराव्या शतकात आपल्याकडे ज्ञानेश्वरी लिहिली गेली. त्यावेळी जर्मन भाषेची परिस्थिती काय होती? आज जर्मन भाषेला एक आधुनिक भाषा म्हणून मान्यता मिळाली आहे, पण मराठीला मात्र नाही. असं का झालं असेल? याचं कारण स्वातंत्र्यपूर्व काळातल्या समाजधुरिणांनी 'वाघिणीचं दूध' म्हणून इंग्रजी शिकून मराठी ज्ञानभाषा म्हणून विकसित करण्यावर भर दिला, तरी प्रत्यक्षात मात्र मराठी बुद्धिजीवी पांढरपेशा, मध्यमवर्गानं संपूर्ण शरणागती पत्करत इंग्रजीचा ज्ञानभाषा म्हणून स्वीकार केला आहे. मराठीला ज्ञानभाषा बनवण्याची जबाबदारी मात्र घेतली नाही.''

या वृत्तीमुळेच एक समाज म्हणून आपण सर्वजण भाषिक दुबळेपण अनुभवतो आहोत. सर्वत्र इंग्रजी भाषेचा स्वीकार वैश्विक सारखेपणाचा आभास निर्माण करतो. प्रत्यक्षात हा मोठ्या प्रमाणातला, इतर भाषांना निष्प्रभ ठरवणारा एक तवंग आहे. इंग्रजीच्या स्वीकाराबरोबरच आपण स्वतःच्या भाषा, संस्कृती पर्यायानं स्वतःविषयीच्या न्यूनगंडानं पछाडले गेलो आहोत. हे आधुनिकीकरण नव्हे, हे सरळसरळ अंधानुकरण आहे. खऱ्या अर्थानं लोकशाहीचं यश हे ज्ञानाची कवाडं सर्वांसाठी खुली असण्यावर अवलंबून आहे. जर स्वभाषेतून शिक्षणं मिळालं तरच हे शक्य आहे. खरं तर भारतासारख्या स्वतंत्र देशात विद्यापीठ पातळीपर्यंत शिक्षण मातृभाषेत पूर्ण करण्याची

सुविधा असायला हवी. परंतु वास्तव तसं नाही. व्यवहारभाषा आणि ज्ञानभाषा म्हणून इंग्रजीवर प्रभुत्व असण्याला सध्या तरी पर्याय नाही. त्यामुळे आता एक समृद्ध भाषा म्हणून ताकदीनं इंग्रजीचं शिक्षण मुलांना मिळायला हवं. या भूमिकेतून शाळेमध्ये विविध उपक्रम घेतले जातात. 'ब्रिज कोर्स' हा त्यातलाच एक महत्त्वाचा उपक्रम!

**ब्रिज कोर्स**

मुलांच्या दहावीच्या परीक्षेनंतरच्या मे महिन्याच्या सुट्ट्यांमध्ये २००४ आणि २०१२मध्ये हा कोर्स घेतला गेला. मराठी शाळेतून बाहेर पडल्यानंतर लगेचच्या काळात इंग्रजीतून बोली व्यवहार करण्याबाबतचा किमान मोकळेपणा आणि आत्मविश्वास मुलांमध्ये यावा, महाविद्यालयाच्या वातावरणात शिकण्याच्या दृष्टीनं समरसून जाण्याच्या वाटेवरील दुव्याचं काम या इंग्रजीच्या कार्यशाळेच्या माध्यमातून व्हावं असा या कोर्सचा हेतू आहे.

२००४मधल्या ब्रिज कोर्ससाठी वर्षा सहस्रबुद्धे आणि हेमा होनवाड यांनी मार्गदर्शन केलं होतं. २०१२मधला ब्रिज कोर्स संगीता खेडकर आणि हेमा होनवाड यांनी घेतला होता. साधारणतः दोन आठवडे तीन ते साडेतीन तासांच्या वर्गाची आखणी केली होती. या दरम्यान मुलांना इंग्रजी ऐकण्याची, बोलण्याची, वाचनाची भरपूर संधी मिळावी यासाठी प्रयत्न केले होते. मुलांना आवडतील अशी उत्तम इंग्रजी गाणी, उतारे, पुस्तके, सिनेमा, प्रश्नावल्या अशी भक्कम पूर्वतयारी होती.

कोर्सच्या सुरुवातीला मुलांसमोर मी शाळेची भूमिका मांडली, ''नदी, समुद्र अथवा भरधाव रहदारीचा रस्ता ओलांडणं शक्य होत नाही, अशा वेळी तिथं पूल बांधला जातो. हा कोर्स हाही एक पूल आहे. शाळेच्या, घराच्या, एका अर्थानं छोट्या पण सुरक्षित जगातून आता तुम्ही अधिक मोठ्या महाविद्यालयीन जगात प्रवेश करणार आहात. हे अंतर ओलांडण्यासाठी हा पूल तुम्हाला मदत करेल अशी आशा आहे. मजबूत पूल तयार होण्यासाठी त्याचा दोन्ही बाजूंचा पाया भक्कम असणं फार आवश्यक आहे. शाळेच्या जगातला मराठी भाषेचा तुमचा पाया मजबूत आहेच. तुम्ही सगळे अगदी बालवयापासून मराठीतच वाढलात, रुजलात, चांगल्या साहित्याची तुम्हांला ओळख झाली आहे, या शिदोरीकडे आता अधिक डोळसपणे तुम्ही बघू शकाल. आता या पुलाची दुसरी बाजू – इंग्रजी माध्यमाची! ही बाजू मजबूत नसेल तर हा पूल डगमगेल. शाळेत इंग्रजीचा पाया घातला आहेच. यापुढे तो अधिक भक्कम करण्याचं काम तुम्हाला करायचं आहे. इंग्रजी भाषेचा पाया पक्का करण्यासाठी तुम्हाला मदत व्हावी यासाठी या ब्रिज कोर्सची आखणी केली आहे.''





अनुक्रमणिका

यानंतर कोर्सच्या मार्गदर्शिका संगीता खेडकर यांनी या कोर्सच्या स्वरूपाचे पॉवर पॉईंट सादरीकरण मुलांसमोर केले. त्यावेळी अक्षरनंदनच्या मुलांचे इंग्रजीचे आकलन चांगले आहे, हे त्यांच्या लक्षात आले. त्यामुळे त्यांनी या कोर्समध्ये माहिती मिळवणं आणि त्या अनुषंगानं संवाद साधणं याच्या अधिकाधिक संधी मुलांना मिळाव्यात यावर भर दिला.

रोज सुरुवातीला परिपाठ असायचा. एखादी वृत्तपत्रातली बातमी वाचून दाखवणे, प्रार्थना, गाणं, thought for the day, असा गटा-गटानं एखादा विषय घेऊन सर्वांसमोर त्याची मांडणी करायची. त्यासाठी वर्गात बॅनर, चित्रं, पोस्टर्स तयार करत. गटातल्या मुलांच्या कलागुणांनुसार झकास सादरीकरणं व्हायची. यामुळे त्यांना लोकांच्या समूहासमोर इंग्रजीतून बोलायचा सराव मिळाला. अशी संधी मुलांना शाळेत मिळत असे याचा फायदा मुलांना जाणवत होता. कोर्सच्या सुरुवातीला दिलेल्या माहितीवर त्यांनी भरपूर प्रश्न काढावेत यावर भर दिला. प्रश्न विचारता आले तर त्यांना बाहेरच्या जगात माहिती मिळवणं सोपं जाईल, यासाठी ही योजना होती. प्रश्न तयार करण्याचा, विचारण्याचा पुरेसा सराव झाल्यानंतर त्याचं प्रतिबिंब 'रोल प्ले'च्या माध्यमातून मुलांनी गटासमोर मांडायचं होतं. त्यांना वेगवेगळे प्रसंग दिले होते. उदाहरणार्थ कॅन्टीनमधील संभाषण, प्राध्यापकांच्या ऑफिसमध्ये जाऊन माहिती विचारणं इ० याबरोबरच दररोज व्याकरण आणि शब्दसंपत्ती वाढवण्यासाठी काम होत असे.

ब्रिज कोर्सचा आणखी एक भाग म्हणजे पहिल्या ब्रिज कोर्समध्ये सहभागी झालेल्या माजी विद्यार्थ्यांनी कोर्समधल्या मुलांशी संवाद साधणं, अनुभव मांडणं. त्यांनी दिलेला कानमंत्र मुलांसाठी फारच महत्त्वाचा ठरला – "काही घाबरायचं कारण नाही. आम्हांला कॉलेजमध्ये इंग्रजी माध्यमातून शिकताना सुरुवातीला जरा बिचकल्यासारखं व्हायचं पण नंतर बिनधास्त बोलायला लागलो." तेव्हा 'Be shameless, घाबरू नका, लाजू नका.' हे जणू घोषवाक्यच झालं होतं त्या गटाचं!

मुलांची विश्लेषणाची क्षमता विकसित व्हावी यासाठी पर्यावरणाचे रक्षण यासारख्या विषयांवर वाद-विवादाचा उपक्रम योजला होता. मुलांच्या भावविश्वाशी जवळीक साधेल असा 'School of rocks' हा सिनेमा बघितला. एका अतिशय कडक शिस्तीच्या शाळेत, काही गफलतीनं शिक्षक म्हणून बदलून आलेल्या एका rock संगीतकारानं उडवलेली धमाल असणारा हा सिनेमा मुलांना खूप आवडला. त्याविषयी इंग्रजीत गप्पा झाल्या.

या कोर्सचा एक भाग मुलांनी पुढे जाऊन कुठलं क्षेत्र निवडायचं या मार्गदर्शनाचा होता. या व्यक्तींची निवड करताना मुळात मराठी भाषेमध्ये रुजलेल्या परंतु अतिशय

आत्मविश्वासानं इंग्रजीचा वापर करू शकणाऱ्या व्यक्तींची निवड केली होती. या वर्षी फर्ग्युसनचे उपप्राचार्य डॉ० सचिन खेडकर यांना पाहुणे म्हणून बोलावले होते. मुलांनी त्यांची मुलाखत घेतली. 'मुलाखत कशी घ्यायची' याची आधी पूर्वतयारी केली होती. पाहुण्यांची ओळख, त्यांचे आभार यासाठीचा विशेष शब्दसंग्रह आणि रचना यांवर बोलणं झालं होतं. मुलांनी धीटपणे त्या-त्या कोर्ससाठी आवश्यक गुण, प्रवेशपद्धत, कॅपिटेशन फी याबद्दल प्रश्न विचारले. विविध अभ्यास शाखांची ओळख व्हावी या उद्देशाने विज्ञान, कला आणि हॉटेल मॅनेजमेंट ह्या विषयातील अनुभवी व्यक्तींच्या व्याख्यानांचं आयोजन केलं होतं.

मुलं खूप रमून गेली होती, अशी आणखी एक गोष्ट म्हणजे पॉवर पॉईंट सादरीकरण. संदर्भशोधन करून इंग्रजीतून मुलांना त्यांचे विचार मांडता यावेत असा उद्देश होता. मुलांनी आपापल्या आवडीनुसार विषय घेतले होते. ब्रिज कोर्सच्या शेवटच्या दिवशी त्यांनी या विषयांचे सादरीकरण केले. ते पाहायला मुद्दाम पाहुणे बोलावले होते. आम्हांला वाटलं होतं की मुलांनी हातातल्या टिपणांचा संदर्भ न घेता बोलावं. पण तेवढी त्यांची तयारी होऊ शकली नाही. सुरुवातीला अजिबात बोलायला तयार नसणारी काही मुलं मात्र शेवटच्या सादरीकरणात छान बोलली. एका गटानं 'The land of culture - Bengal' असा विषय घेतला होता तर दुसऱ्या गटानं स्टीव्ह जॉब्ज हा भरपूर माहिती उपलब्ध असलेला विषय निवडला. तिसऱ्या गटानं 'The Unforgettable Journey – Aksharnandan' हा विषय घेतला होता. यासाठी शाळेचे पत्रक, फोटो, शिक्षकांची मुलाखत वापरली. इतक्या वर्षांत त्यांना जे समजलंय ते त्यांनी सहजपणे व्यक्त केलं. खूप हृद्य झालं त्याचं सादरीकरण!

**प्रतिसाद**

या कोर्समागचा आमचा हेतू चांगल्या प्रकारे साध्य झाला, हे मुलांच्या प्रतिसादांतून समजलं. एकजात सर्व मुलांनी सांगितलं की या प्रक्रियेमधून त्यांचा आत्मविश्वास निश्चिततपणे वाढला. मुलांना इंग्रजीची भीती तर कधी नव्हतीच पण त्यांची इंग्रजीशी थोडी अधिक मैत्री झाली, सहजता वाढली.

या ब्रिज कोर्समध्ये सहभागी झालेल्या मल्हार अत्रे या विद्यार्थ्याची 'सकाळ'मध्ये आलेल्या लेखामधली प्रतिक्रिया प्रातिनिधिक आणि बोलकी आहे. ''सुट्टी एन्जॉय करायच्या मूडमध्ये असतानाच शाळेकडून 'ब्रिज कोर्स'ची सूचना मिळाली. आम्हां मित्र-मैत्रिणींना वाटलं, आता नव्यानं कसला तरी अभ्यास करावा लागणार बहुधा. पण या कोर्सची एकेक सत्रं जशी सुरू झाली, तसंतसं आम्ही त्यात पूर्णपणे रंगून गेलो. गुरफटून गेलो आणि शेवटीशेवटी तर तो संपूच नये, असंही वाटलं.





अनुक्रमणिका

"सुरुवातीला शब्दांची जुळवाजुळव करताना, सलग वाक्य बोलताना बहुतेकांची त्रेधातिरपीट उडायची पण, हळूहळू इतक्या लवकर आम्ही त्यातून बाहेर पडलो, की आमचं आम्हांलाच आश्चर्य वाटू लागलं. अगदी फाडफाड नाही, पण दहा दिवसांनंतर आम्ही आत्मविश्वासानं इंग्रजीत संभाषण करू लागलो. ई-मेलवरून सहजपणे इंग्रजीतून संपर्क साधू लागलो. मुळात शाळेतच भाषेची गोडी निर्माण करण्याचं काम झालं होतं, त्यामुळे पुढचं फार कठीण गेलं नाही."

आमच्या पातळीवरही काही स्पष्टता आली. मुलांची शब्दसंपदा कमी पडत होती. वाक्यं बनवताना ती थोडं अडखळत होती. पारिभाषिक शब्दांची ओळख, ग्रंथालयाची भाषा म्हणून इंग्रजी हाताळण्याची संधी या गोष्टींवर शाळेत भर द्यायला हवा असं जाणवलं. एकंदरीतच इंग्रजीकडे जे कामापुरतं म्हणजे interview देण्याकरता किंवा व्यवहारापुरतं पाहिलं जातं, तसं न होता इंग्रजी भाषा समजावून घेताना त्या भाषेच्या संस्कृतीसह समजावून घ्यायला हवी. अर्थात फक्त शालेय शिक्षणाच्या शेवटी ब्रिज कोर्स घेण्यानं प्रश्न सुटणार नाहीयेत. पण शालेय शिक्षणातूनच या पुलाची ताकद वाढवत न्यायला हवी. मुख्य म्हणजे आपल्या भाषेसंदर्भात लोकांच्या मनात जी न्यूनत्वाची भावना आहे ती जाऊन तिची जागा आत्मविश्वासानं घ्यायला हवी.

विरोध इंग्रजी भाषेला नाही, त्याच्या वर्चस्वाला आहे. इंग्रजी येणं हा व्यक्तीची पात्रता ठरवणारा एकमेव निकष बनत चालला आहे. आज इंग्रजीनं आपली मानगूट पकडली आहे, आपल्याला जर इंग्रजीची मानगूट पकडायची असेल तर आपली मनगटं बळकट करायला हवीत.



हाच लेख 'पालकनीती'च्या दिवाळी अंक २०१२मध्ये प्रसिद्ध झाला आहे. परिशिष्ट १देखील पाहावे. – संपादक





अनुक्रमणिका

# सेमी-इंग्रजी : सुवर्णमध्य की सुवर्णमृग?

मनोहर राईलकर

"सेमी-इंग्रजी म्हणजे काय?"

"गणित आणि विज्ञान इंग्रजीतून शिकवायचे. आणि इतर विषय मराठीतून."

"का?"

"ते महत्त्वाचे विषय आहेत."

"इतर विषय बिनमहत्त्वाचे का?"

"कमी महत्त्वाचे म्हणा."

"आणि हे कुणी ठरवलं? कोणत्या निकषांवर ठरवलं?"

"सर्व समाजाला ते मान्यच आहे."

"सर्व समाजाला? तुम्हांला कसं कळलं?"

"लोक बोलतात नाही का?"

"बरं बिनमहत्त्वाचे विषय कोणते?"

"इतिहास-भूगोल, नागरिकशास्त्र आणि मराठी."

"मराठी बिनमहत्त्वाचा?"

"एक म्हणजे त्यात शिकवण्यासारखं काही नसतंच. आणि मराठी तर घरीसुद्धा शिकवता येतं."

"शिकवण्यासारखं काही नसतं? म्हणून बिनमहत्त्वाचा?"

गंमत म्हणजे, शिकवण्यासारखं मराठीत काही नसतं आणि ते घरी शिकवता येतं असं पालकांनासुद्धा वाटतं! 'लोकसत्ता'च्या माजी वरिष्ठ सहसंपादिका श्रीमती शुभदा चौकरांनी पालकांशी संवाद साधून त्यांचं म्हणणं समजावून घेतलं आणि त्याचं टिपण बनवलं. तेव्हा त्यांना पालकांचा असाच अनुभव आला. मग मराठीत मुलं इतक्या मोठ्या प्रमाणात अनुत्तीर्ण का व्हावीत? २००४ साली यावर मराठी अभ्यास परिषदेनं परिसंवादही घेतला होता.

(१)(अ) सेमी-इंग्रजीच्या (अ)विचारामुळं, स्वाभिमानशून्यता, स्वभाषेचा अपमान, इंग्रजीचं मानसिक दास्य, आत्मवंचना, तर्कदुष्टता, समाजाची फसवणूक आणि वेडगळपणा या (दुर्)गुणांचं दर्शन एकाच वेळी होतं.

एक तर, महत्त्वाचे आणि कमी किंवा बिनमहत्त्वाचे ही विभागणी कोणत्या कसोटीवर केली, हे कुणी सांगू शकत नाही. दुसरं, विषय जर बिनमहत्त्वाचे असतील तर शिक्षणक्रमात ठेवलेतच कशाकरता? ही तर्कदुष्टता. आणि तिसरं, महत्त्वाचे विषय इंग्रजीतून का शिकवायचे यामागचं तर्कशास्त्र काय? इंग्रजी म्हणजे जादूची कांडी आहे काय की तिच्यामुळं सर्व विद्यार्थी झटक्यात विद्वान होतील? तसं असेल तर मग इंग्लंड आणि अमेरिकेतील मुलांचं गणित कच्चं कसं? विश्वास बसत नाही ना? मग या वार्ता पाहा.

(क) इंग्लंडमधील कर्मचाऱ्यांचं गणित आणि इंग्रजी(ही) कच्चं (सकाळ, २२ ऑगस्ट २००६).

(ख) गणितात अपयशी होणाऱ्या विद्यार्थ्यांचं प्रमाण अमेरिकेत वाढत आहे. (अनुभव – ऑगस्ट २००६).

(ग) अमेरिकेतील विद्यार्थ्यांचेही गणित कच्चे (सकाळ, २१ नोव्हेंबर २००६).

(आ) कोणतेही विषय महत्त्वाचे असतील तर ते चांगले समजण्याकरता, मुळात, मातृभाषेतूच शिकवणं आवश्यक असताना परकीय भाषेतून शिकवणं हा वेडगळपणा आणि तर्कदुष्टता नव्हे काय? सर्व राष्ट्रं शिक्षणासाठी मातृभाषेचाच माध्यम म्हणून उपयोग करतात. त्याबद्दल नंतर काही प्रमाणं देईनच. पण, खरं म्हणजे आपल्याच मनातून अजून इंग्रजीचं माहात्म्य लोपलं नाही. मानेवरचं तिच्या श्रेष्ठत्वाचं भूत उतरलं नाही. आणि तिच्या मानसिक दास्यातून अजून मुक्त झालो नाही. त्यामुळंच, गणित आणि विज्ञान विषय (अत्यंत) महत्त्वाचे म्हणून ते इंग्रजीतून शिकवावेसे वाटणं हे त्याचं लक्षण आहे.

(इ) कमी किंवा बिनमहत्त्वाचे विषय मराठीला देणं आणि मराठीला आपणच कमी महत्त्वाचा विषय मानणं ही स्वाभिमानशून्यता असून स्वभाषा मराठीचा घोर अपमान होय. असे कुणी शिक्षणतज्ज्ञ असतील तर त्यांना तत्काल सन्मानपूर्वक सेवामुक्त करायला हवं. गणित आणि विज्ञान शिकवण्याकरता इंग्रजीशिवाय पर्याय नाही, असं आपण म्हणू शकतो. मग देश चालवण्यास भारतीय पात्र नाहीत, हे मान्य करून पुन्हा एकदा

ब्रिटिशांना किंवा अमेरिकींना बोलवायचं का? ते जर स्वाभिमानशून्यतेचं दर्शक असेल तर हेही तितकंच स्वाभिमानशून्यतेचं दर्शक नाही का?

गणित आणि विज्ञान शिकवण्याकरता स्वातंत्र्याच्या पासष्ट वर्षांनंतरही मराठी पात्र नाही, हे तरी कुणी आणि कशाच्या आधारावर ठरवलं? काही सांख्यिकीय प्रयोगांचा तो निष्कर्ष म्हणावा तर तसंही दिसत नाही. कुणी तरी एकदा म्हटलं असेल. तेही कसल्याही आधाराविनाच, सर्व समाज त्याचीच री ओढायला लागला, असं आहे का?.

(ई) एकदा दास्य पत्करलं की होमर (ग्रीक कवी नव्हे, इंग्रज तत्त्वज्ञ) म्हणतो तसं माणसाचे सर्व गुण त्याला सोडून जातात. स्वाभिमान हा त्या गुणांचा नेता असतो. त्याच्या पाठोपाठ सारासार विचार, बुद्धी, भाषा. संस्कृती, इत्यादी सगळेच गुण निघून जातात. ज्ञानदेव म्हणतात तसं उचललेया प्राणांसरशी। इंद्रियेही निगती जैसी।

इ०स० सोळाव्या ते अठराव्या शतकांत इंग्रज शिष्टही इंग्रजीची अशीच हेटाळणी करीत. इंग्रजीला रांगडी, भरड, जंगली, गावंढळ, कुचकामी, असली विशेषणं लावीत! (पाहा – The Triumph of the English Language, Richard Foster Jones पान ७.) कारण इंग्लंडही फ्रेंचांनी जिंकल्यामुळं ते फ्रेंचांचं गुलाम होतं. आणि कैक वर्षं मानसिक दासही होतं. त्याचं खरं कारण, स्वार्थ. फ्रेंचऐवजी इंग्रजीतून सर्वांनाच वैद्यकीय शास्त्र शिकवलं तर आमच्या व्यवसायावर दुष्परिणाम होईल, असं डॉक्टरच म्हणायचे. (Jones, पान ५०)

(ऊ) अर्ध-इंग्रजी म्हणजे सुवर्णमध्य, हा शब्दच फसवा आहे. गणित आणि विज्ञान हे विषय महत्त्वाचे म्हणून इंग्रजीतून. इतर विषय बिनमहत्त्वाचे, म्हणून मराठीत. परिणामी भारित सरासरी (Weighted mean) काढली तर अर्ध-इंग्रजीचा अर्थ नव्वद टक्के वा अधिकच इंग्रजी असल्याचं समजून येईल. आडवळणानं सर्वच स्तरांवर पूर्ण इंग्रजीच लादण्याचा छुपा कार्यक्रम असून तो लक्षात येऊ नये, याकरता ही धूळफेक असावी.

या सुवर्णमृगाला सुवर्णमध्य असं गोंडस नाव देऊन आत्मवंचना आणि समाजाच्याही डोळ्यांत धूळफेक का चालू आहे? त्यापेक्षा, उघडपणं, पूर्ण इंग्रजीच माध्यम ठरवण्यानं फसगत तरी टळेल. आणि पूर्वसूरींनी व आयोगानं दिलेल्या धोक्यांना **पूर्णपणं** सामोरे जाण्याची मानसिक सिद्धता





अनुक्रमणिका

तरी साधेल. इंग्रजीचा एक दबावगट आपल्याकडे सुप्तपणं कार्य करीत असावा, असा मला दाट संशय आहे. आणि आपली काही मेंढरं त्या वाघाकडे आपसूक ओढली जात असावीत.

हा सारा खटाटोप मी "सुवर्णमध्य" या कल्पनेचा सुवर्ण-मुलामा खरवडून आतलं पितळ दाखवण्याकरता केला आहे! यामागं इंग्रजी भाषेच्या वरचढपणांचं भूत आपल्या मानगुटीला बसल्याचं जाणवतं, हे पाहिलंच आहे. सर्वच विषय इंग्रजीतून शिकवणं आवश्यक (छुपा हेतू) असताना काही विषय मराठीतून शिकवले पाहिजेत, असं तरी का दाखवावं? यातून मला सुवर्णपित्तल-न्याय हा नवा न्याय सापडला. (जर पुरातन असेल तर स्वतःचं अज्ञान मला मान्य.)

(२)(अ) महत्त्वाचे विषय व्यक्त करण्याची मराठीची पात्रता नाही, असं म्हणायचंय का? हे कसं ठरवलं? की तुमचीच पात्रता नाही? मी स्वतः पदव्युत्तर पातळीपुढील दोन पुस्तकांचं मराठी रूपांतर पस्तीस वर्षांपूर्वीच केलं आहे. आणि एक स्वतंत्र पुस्तकही लिहिलं आहे. आपल्या विषयावर जर प्रभुत्व असेल तर तो आपल्या भाषेत मांडता येतोच. येत नसेल तर त्याचा अर्थ विषय नीटसा समजला नाही, हाच.

अलीकडची घटना. माझ्या सुनेची भाची जर्मनीला जाऊन आली. अनेक देशांतील मुलं आली होती. हिनं त्यांना विचारलं, "तुमच्याकडे कोणत्या भाषेतून शिकवतात?" तिच्या प्रश्नाचा अर्थच प्रथम कुणाला कळेना. तिनं अधिक स्पष्टीकरण दिलं. म्हणजे काय तर, आमच्याकडे इंग्रजीतून शिकवतात, असं सांगितलं. तेव्हा सर्व मुलांना धक्काच बसला. याचा अर्थ सर्वकडे मातृभाषेतून शिकणं हेच उचित मानतात. मग, इंग्रजी किंवा सुवर्णमध्य अशा माध्यमापासूनचे लाभ इंग्रजी सेमी-इंग्रजीच्या पुरस्कर्त्यांनी सांगायला नकोत? भारत वगळता अन्य कोणत्या देशात परकीय वा अर्ध-परकीय भाषेतून शिकवण्याची पद्धत आहे का, याची काही माहिती संबंधित विद्वान देतील का?

नालंदा विद्यापीठ भक्तियार खिलजीनं ११९३ साली जाळलं. तेव्हा ते सहा महिने जळत होतं. काहीजण म्हणतात तीन महिने. ठीक, तीन. पण म्हणजे किती ग्रंथ असतील? इतके ग्रंथ लिहिणाऱ्यांना इंग्रजीचा आधार होता का? कारण तेव्हा तर इंग्रजी भाषेचं अस्तित्वच नव्हतं. जी भाषा

होती, तिला अँग्लो-सॅक्सन म्हणत. लिपीसुद्धा जुन्या जर्मनप्रमाणं गॉथिक असे.

"किमान २५०० वर्षांपूर्वी पायथागोरस सामोसपासून गंगेपर्यंत गेला तो केवळ भूमिती शिकण्यासाठीच," असं फ्रांस्वा वोल्तेर या फ्रेंच लेखकानं म्हटलं आहे.

अशी आणखी कितीतरी उदाहरणं मी देऊ शकेन. नौकानयनशास्त्र, वास्तुशास्त्र, आयुर्विद्याशास्त्र, विमानविद्याशास्त्र, अवयवारोपण-शास्त्र, अशी कित्येक शास्त्रं कितीतरी पूर्वीपासून भारतात विकसली होती. त्यांना काय इंग्रजीचा आधार होता?

खरं तर आवश्यकता कशाची असेल तर न्यूनगंड झटकून गणित, विज्ञान, सर्वच विषयांतील यासंबंधीच्या परभाषांतील पुस्तकांच्या रूपांतराचं काम वेगानं करण्याची. आणि सर्व स्तरांवरील स्वतंत्र पुस्तकांचं लेखन करण्याची. अगदी तातडीनं. पाचसहा वर्षं हे काम करू. मग आज जे प्रश्न आपल्याला भेडसावीत आहेत, ते अस्तित्वातच नसल्याचं आपल्याला दिसून येईल.

खरं तर आवश्यकता कशाची असेल तर न्यूनगंड झटकून गणित, विज्ञान, सर्वच विषयांतील यासंबंधीच्या परभाषांतील पुस्तकांच्या रूपांतराचं काम वेगानं करण्याची. आणि सर्व स्तरांवरील स्वतंत्र पुस्तकांचं लेखन करण्याची. अगदी तातडीनं. पाचसहा वर्षं हे काम करू. मग आज जे प्रश्न आपल्याला भेडसावीत आहेत, ते अस्तित्वातच नसल्याचं आपल्याला दिसून येईल.

(आ) स्वभाषामाध्यमामुळं जपान, द० कोरिया यांना झालेले लाभ मी सांगतो. NCLसाख्या संस्था जपानमध्ये ५,३००, द० कोरियात ३,७२३ आणि भारतात केवळ १९ आहेत. (लोकसत्ता, ११ मार्च २०१०, डॉ० माशेलकर). जपानला विज्ञानातील ६ नोबेल (१९४९चं भौतिकीतलं एक, हिकेडी युकावा यांना, २००८ सालची भौतिकीतली दोन, माकोटो कोबायाशी व टोशिहिदो मस्कावा यांना, २०१०ची रसायनातील दोन, इची नेगिशी व अकिरा सुझुकी यांना आणि सहावं, २०१२चं वैद्यकीय नोबेल यामानाका यांना). द० कोरियाला किमान १ आणि स्वतंत्र भारताला शून्य.





अनुक्रमणिका

जगातल्या सर्वोत्कृष्ट विद्यापीठांत जपानची ६, द० कोरियाचं किमान १ (लोकसत्ता, १४ सप्टेंबर २०१२). भारताचं? शून्य. आपल्या महान देशाच्या तुलनेत लोकसंख्येनं चिल्लर अशा, पण मातृभाषेतूनच शिकवणाऱ्या, कॅनडा, स्वित्झर्लंड, हाँगकाँग, सिंगापूर, फ्रान्स, फिनलंड, स्वीडन, तैवान, बेल्जियम, न्यूझीलंड, या देशांच्या विद्यापीठांचीही नावंही यादीत आहेत. आपल्या दुरवस्थेचीची कारणं इंग्रजी वा सेमी-इंग्रजीच्या पुरस्कर्त्यांनी पुरवावीत, किंवा शोधावीत.

(३) परकीय भाषांतून शिकण्या-शिकवण्याबद्दल पूर्वसूरी काय म्हणतात आता पाहू.

(अ) लो० टिळक (लो० टिळकांचे निबंध, पान ६२) इंग्रजी भाषा फार द्वाड आहे. ती लवकर येत नाही. राज्यकर्त्यांची म्हणून शिकावी लागते. आमच्यावर ते निव्वळ ओझे आहे. आम्हाला मराठी शिक्षण मिळत नसल्यामुळं फार नुकसान होत आहे. आम्ही हे इंग्रजी भाषेचे ज्ञान शिकण्यात अनेक वर्षे फुकट घालवली. मला मिळालेले ज्ञान मराठी भाषेत असते तर हे सर्व ५२ वर्षांचे ज्ञान पंचविसाव्या किंवा तिसाव्या वर्षी मिळाले असते. परक्या भाषेत शिक्षण देणं म्हणजे राष्ट्राला खच्ची करण्यासारखं आहे. याच करता देशी भाषेत शिक्षण दिले पाहिजे.

(आ) गांधीजी (यंग इंडिया, २ फेब्रुवारी १९२१): इंग्रजीनं आपल्या मनात मानाचं स्थान पटकावलं असून आपल्या भाषांना हद्दपार केलं आहे... आज इंग्रजीनं आपल्या अंतःकरणात मानाचं स्थान पटकावलं असून आपल्या भाषांना हद्दपार केलं आहे... इंग्रजी येत असल्याशिवाय आपल्या मुलांना उच्च समाजात मानाचं प्रवेश मिळणार नाही, अशी समजूत करून देणं म्हणजे आपल्या पौरुषावरील विशेषतः स्त्रीत्वावरील अत्याचार होय. हा विचार इतका अपमानकारक आहे की तो सहन करणं शक्य नाही. इंग्रजीबद्दलचा हा मूर्ख विचार नष्ट करणं हे स्वराज्यातील एक मोठं कार्य होय. (यंग इंडिया १ सप्टेंबर १९२१) ज्या राष्ट्रातील मुलांना स्वतःच्या भाषेव्यतिरिक्त इतर भाषेतून शिक्षण घ्यावं लागतं, ते राष्ट्र आत्मघातच करीत असतं... परक्या माध्यमामुळं मुलांना बुद्धिमांद्य आलं असून त्यांच्या ज्ञानतंतूंवर अनावश्यक ताण निर्माण करीत असतं... परक्या माध्यमामुळं आपल्या मुलांना देशातच परकीय बनवलं

आहे. ही सर्वांत मोठी शोकांतिका आहे.... अंकगणित, भूमिती, बीजगणित, रसायन आणि ज्योतिष या विषयांचं जे ज्ञान घेण्यास मला चार वर्षं लागली, तेच जर मी गुजरातीतून शिकलो असतो तर, एका वर्षात मिळवू शकलो असतो....

(इ) रवींद्रनाथ ठाकूर (कोलकाता विद्यापीठाच्या पदवीदन समारंभातील भाषण. कोठारी आयोग पान १३) म्हणाले, शिक्षणाची भाषा आणि बालकाची भाषा यांच्यात फारकत केलेला जगात भारताशिवाय दुसरा देश नाही. पाश्चात्य ज्ञानाकडे वळल्याला जपानला पुरती शंभर वर्षेही लोटली नाहीत.... पण, शिक्षणाकरता स्वदेशीवरच निर्भर राहायचे असा त्यांचा निर्धार होता. कारण, असले शिक्षण त्यांना निवडक नागरिकांपुरते आणि शोभेसाठी नको होते. तर **सर्वच** नागरिकांना समर्थ आणि सुसंस्कृत करण्यासाठी हवे होते....परिणामी पाश्चात्यांच्या शोषणप्रवृत्तीला सामोरे जाणे आणि जगात स्वतःसाठी मानाचं स्थान उभारणं त्यांना शक्य झालं. म्हणून फारच थोड्यांच्या आवाक्यात येऊ शकेल अशा परकीय माध्यमातून शिक्षण देण्याचा मूढपणा त्यांनी केला नाही.

(ई) कोठारी आयोग, पान १३, १४.

शिक्षणाच्या अगदी तळापासून थेट सर्वोच्च पातळीपर्यंत शिक्षणाचं माध्यम प्रादेशिक भाषा असण्याचं महत्त्व राष्ट्रीय एकात्मतेच्या दृष्टीनं अनन्य आहे. सर्वसाधारण समाज आणि शिक्षित वर्ग यांच्यांत आज असलेली दरी तातडीनं दूर करण्याची आवश्यकता आहे. शिक्षणासाठी केवळ प्रादेशिक भाषांचा अवलंब करण्यानंच ती नाहीशी होईल... परकीय भाषेतून शिकण्यामुळं विषयावर प्रभुत्व मिळवण्याऐवजी विद्यार्थी घोकंपट्टी करतात. शिवाय, शाळांत व महाविद्यालयांत एकच माध्यम असण्यामुळंच शिक्षणाला भक्कम आधार मिळू शकतो. आणि ज्याअर्थी आपण शालेय पातळीवर प्रादेशिक भाषामाध्यमाचा अवलंब करण्याचा सुज्ञपणा दाखवला आहे, त्याअर्थी वाढत्या प्रमाणात महाविद्यालय पातळीवरही तेच धोरण अवलंबणं सुसंगत होईल. प्रादेशिक भाषांतून घेतलेल्या शिक्षणामुळं त्यांच्या ज्ञानाचा आणि विचारशक्तीचा दर्जा निश्चितच उच्च राहील. आणि ज्ञानाच्या कक्षा विकसित करण्यासाठी संशोधनात्मक कार्यासाठी ते फार मोठी प्रेरणा देऊ शकतील...





अनुक्रमणिका

निवडलेल्या माध्यमाचं काम विद्यार्थ्यांना सुलभतेनं ज्ञान ग्रहण करता यावं आणि अचूक विचार करून आपलं म्हणणं स्पष्टपणं आणि आत्मविश्वासानं व्यक्त करता यावेत हे आहे. या दृष्टिकोनातून पाहिलं तर मातृभाषेचं स्थान सर्वोच्च आहे... शिक्षणाच्या माध्यमातील बदल जितका सांस्कृतिक आणि राजकीय मानसिकतेकरता आवश्यक आहे, तितकाच, किंबहुना काकणभर अधिकच विषयाचं आकलन आणि समजूत होण्याकरता म्हणजे शैक्षणिक दृष्ट्यासुद्धा समर्थनीय आहे. आणखी, जर विद्यापीठातील विद्वान मंडळी आणि सर्वसाधारण समाज यांच्या दरम्यान प्रादेशिक भाषांच्या माध्यमातून सातत्यानं देवाणघेवाण चालू राहिली नाही तर विद्यापीठीय अध्यापक राष्ट्राच्या प्रगतीत कसलीही ठोस भर घालू शकणार नाहीत... कोठारी आयोग पान १४) राष्ट्रीय एकात्मतेकरता तळापासून ते थेट वरपर्यंतच्या शिक्षणाचं माध्यम म्हणून मातृभाषेचे स्थान अत्यंत महत्त्वाचं आहे, असं राष्ट्रीय एकात्मता समितीचं मत आहे. भावनात्मक एकात्मतेकरता अगदी तळापासून ते सर्वोच्च पातळीपर्यंत प्रादेशिक भाषांचाच अवलंब शिक्षणाकरता करणं निर्विवादपणं परम महत्त्वाचं आहे, असं भावनात्मक एकात्मता समितीचं मत आहे. त्याला राष्ट्रीय एकात्मता मंडळाचाही पाठिंबा आहे... प्रादेशिक भाषांतून शिक्षण असण्यानं होणारे लाभ आम्हाला पटले आहेत. देशाच्या सार्वत्रिक प्रगतीच्या दृष्टीनं टाकलेलं पाऊल म्हणून प्रादेशिक भाषांचा विकास आम्हाला अत्यंत महत्त्वाचा वाटतो. शिक्षणाची गुणवत्ता सुधारण्याकरता टाकलेलं ते एक महत्त्वाचं पाऊल आहे..... परकीय भाषेतून शिकताना विषयावर प्रभुत्व मिळवण्याऐवजी विद्यार्थी घोकंपट्टी करतात.

(४) एका दाव्याचा (SC 1702/1994) निर्णय सांगताना परिच्छेद १९मध्ये सर्वोच्च न्यायालयाचे न्यायाधीश काय म्हणतात ते पाहू.

बालवयात अपरिचित भाषेत ज्ञानग्रहण करावं लागतं तेव्हा शिक्षणप्रक्रिया अनैसर्गिक बनते. त्यामुळं त्याचा क्रूर ताण बालकांना सहन करावा लागतो. कारण ती प्रक्रिया अत्यंत यांत्रिक असल्याने ती कृत्रिम आणि यातनामय होते.

■

# पुण्यातील अक्षरनंदन ह्या शाळेने २००४मध्ये सुरू केलेल्या ब्रिज कोर्ससंबंधात श्री० वसंतराव पळशीकर यांनी इंग्रजीतून केलेल्या भाषणाचे संक्षिप्त रूपांतर

मुलांनो, तुम्ही आता आयुष्यातला एक टप्पा पूर्ण केला आहे. मूल असताना तुम्हाला 'मी कोण आहे' असा प्रश्न काही पडला नसेल! माझी ओळख काय, ह्या प्रश्नाला लहानपणी तोंड द्यावं लागत नाही. पण मोठं झाल्यावर कधीना कधी हा प्रश्न समोर उभा रहातोच!

आपल्याला आपली ओळख कशातून मिळते? आपल्या ओळखीचा एक भाग म्हणजे आपलं नाव. आपल्याला आपल्या आई-वडिलांनी नाव दिलेलं असतं. तेव्हा आपले नातेवाईक शेजारीपाजारी, मित्रमंडळी असे सगळे हजर असतात. हा सगळा गोतावळा आपल्याला नाव देतो. हे नाव जर नसेल तर आपल्या मनाची काय अवस्था होईल? विचार करा. आपल्याला शरीर आहे, मन आहे पण त्याला नाव नाही! आपलं माणूसपण ही आपल्याला आपल्या समाजानं दिलेली देणगी आहे. यातूनच आपल्याला आपली ओळख, आपलं व्यक्तित्व मिळतं. ते एकमेवाद्वितीय असतं. ही स्वतःची ओळख मिळण्यात भाषेचा मोठा वाटा असतो. आत्ता मला या ब्रिज कोर्समध्ये इंग्रजीत बोलायला सांगितलं तेव्हा मला वाटलं, 'बापरे! इंग्रजीत बोलायचं?' 'बापरे!' हे शब्द तुमच्या मनाची अवस्था सांगतात. ते नुसते शब्द नाहीत. ते तुमच्या भावना व्यक्त करतात. त्यातले पदर-छटा त्या भाषेत वाढलेल्यालाच बरोबर समजतात. 'बापरे'चं भाषांतर काय होईल? तो नुसता एक निर्जीव शब्द होऊन बसेल! आपल्यासाठी मराठीत त्या शब्दाला जीव असतो. आधीच्या अनेक घटनांशी तिचं जोडलेपण असतं, शब्द उच्चारताक्षणी ते त्या भाषेत वाढलेल्या लोकांना समजतं. प्रत्येक भाषेतच असे शब्द असतात. ती ती मातृभाषा असणाऱ्यांना ते समजतात. पण इतर भाषकांना ते त्याच पद्धतीनं भिडत नाहीत. कारण आपण त्या त्या भाषेत वाढलेले असतो. ज्या वस्तीत, गल्लीत, मोहल्ल्यात आपण वाढतो, ज्या समाजात वाढतो, त्यातूनच आपण 'माणूस' बनतो. थोडक्यात काय तर आपल्याला आपलं माणूसपण, आपली ओळख मिळण्यात आपल्या परिसरभाषेची भूमिका महत्त्वाची आहे. आपली भाषा म्हणजे आपण शाळेतल्या वर्गात शिकतो ती, तेवढीच भाषा नव्हे. नैसर्गिकपणे ज्या भाषेत आपण वाढतो, घरी-दारी कानावर पडणारी भाषा. मातृभाषेबद्दलचा विश्वास म्हणजे स्वतःवरील विश्वास. आपली भाषा आपल्याला जन्मानं मिळाली आहे. जसे आई-वडील मिळाले





अनुक्रमणिका

तशी! ती काही आपली निवड नसते. तुम्ही त्यांना सोडून दूर गेलात तरी ते तुमचे आई-वडीलच असतात. असंच मातृभाषेचंही असतं. ती तुम्हाला भावना देते, जाणिवा देते, स्वप्न देते.

गांधीजी म्हणतात, ''तुम्हाला हवी तितकी इंग्रजी शिका, पण ते शिकताना जर तुम्ही तुमच्या भाषेला टाळू लागलात, कमी लेखू लागलात तर तुम्ही तुमची ओळखच काही अंशी हरवता. तुमच्या मनाचा गोंधळ उडतो, कारण तुम्ही स्वभाषेच्या स्थिर पायावर उभे नसता.''

तुम्ही इंग्रजी अगदी आत्मविश्वासपूर्वक बोलू शकाल. पण, त्या भाषेत तुम्ही वाढलेला नाहीत, ती तुमच्या समाजाची भाषा नाही. त्यामुळे इंग्रजी ही आपल्यासाठी 'साधन' आहे. पण मराठी केवळ साधन नाही. ती तुम्हाला तुमची ओळख, अस्मिता, व्यक्तिमत्व देणारी भाषा आहे, जीवनभाषा आहे. तुम्ही दोन गोष्टी लक्षात ठेवा, पहिलं म्हणजे इंग्रजी केवळ फाडफाड बोलण्यापुरतं शिकू नका. त्यातलं साहित्य वाचा. त्यातून एक नवी दुनिया भेटीला येईल. तुम्हाला त्यांच्या संस्कृतीची ओळख होईल. विविधता जग अधिक सुंदर बनवते. मात्र दुसरी बाजूही तितकीच महत्त्वाची आहे. आपल्या भाषेवर आपलं प्रभुत्व असायला हवं. जगातल्या इतर कुठल्याही भाषेइतकीच तीही तोलामोलाची आहे असं भान जागं असायला हवं.

■

**जगद्विख्यात ग्रंथकारांपैकी ९० टक्के ग्रंथकार इंग्रजेतर!**

टॉलस्टॉय, कार्ल मार्क्स, शोपेन् हौर, गटे, रोमा रोला, टागोर, गांधी, शॉ, वेल्स यांसारख्या सर्व जगातील बुद्धिमंतांच्या वाचनात येणाऱ्या ग्रंथकारांचे ग्रंथ आपण इंग्रजीतून वाचतो आणि इंग्रजी भाषेच्या पायी कृतार्थतेने लोटांगण घेतो. पण अशा जगद्विख्यात आणि जगत्प्रेरक ग्रंथकारांपैकी शेकडा नव्वद ग्रंथकार इंग्रजेतर असतात हे आपण – इंग्रजी घोकीत लहानाचे मोठे झालेले – आधुनिक सुशिक्षित कधीच लक्षात आणीत नाही. जगाच्या पाठीवर हिंदुस्थानखेरीज इंग्रजी 'कंपलसरी' नाही; तरी जगाच्या पाठीवरील प्रत्येक देशात वरील ग्रंथकार बुद्धिमंतांच्या परिचयाचे आहेत.

– श्री०के० क्षीरसागर

('मराठी भाषा : वाढ आणि बिघाड'मधून)

# इंग्रजी शिकायला इंग्रजी शाळेची गरज नाही!

सुचिकांत वनारसे

नेहमीप्रमाणे यावर्षी देखील आपल्या पाल्यासाठी महाराष्ट्रातील लाखो पालकांनी पुन्हा एकदा मराठी माध्यमातून शिक्षणालाच पसंती दिली आणि मराठी शाळांच्या लोकप्रियतेवर पुन्हा एकदा शिक्कामोर्तब झाले. मराठी शाळा संपल्या... कुठे मराठी शाळेत प्रवेश घेता? असे म्हणून आपल्यासोबत इतरांचंही मत मराठी शाळांच्याबाबत कलुषित करणाऱ्या मराठी शाळा द्वेष्ट्यांना मराठी जनतेने सणसणीत चपराक दिली. एवढेच नाही तर दरवर्षीची परंपरा कायम राखत यावर्षी देखील हजारो विद्यार्थ्यांनी इंग्रजी माध्यमातून मराठी माध्यमाकडे माध्यमांतर देखील केले. आपल्या पाल्याला इंग्रजी माध्यमाच्या शाळेतून काढून मराठी माध्यमाच्या शाळेत प्रवेश घेणाऱ्या या पालकांचे दुप्पट कौतुक आणि आभार!

दरवर्षी हजारोंच्या संख्येने इंग्रजी शाळांकडून मराठी शाळांकडे अशी माध्यमांतरे का बरे होत असतील? काय कारणे असतील? हा आकडा कमी आहे का? अजूनही हा आकडा वाढू शकतो का? इंग्रजी माध्यम बदलून पाल्यासाठी मराठी माध्यमाची शाळा निवडल्यास लोक काय म्हणतील, म्हणून शहरी पालक गप्प बसत आहेत का? असे हजारो प्रश्न आज शिक्षण क्षेत्रात विचारले जात आहेत. हा आकडा वाढत राहिला तर अजून काही वर्षांनी मराठी नाही पण इंग्रजी शाळांच्या अस्तित्वाचा प्रश्न निर्माण होईल, हे कोणत्याही शिक्षणतज्ज्ञांच्या लक्षात येत नाही. किंबहुना या मुद्द्यावर कोणत्याही वृत्तवाहिनीवर चर्चाही घडत नाहीत. एका दृष्टीने हे सर्व चांगलंच आहे.

मराठी शाळांच्या जुन्नर पॅटर्न, हिवरे बाजार पॅटर्न, केंजळ पॅटर्नमुळे, गल्लाभरू आणि दर्जाहीन इंग्रजी शाळांची येत्या काही वर्षांत पळता भुई थोडी होणार हे मात्र नक्की आहे आणि लवकरच इंग्रजी शाळा प्रेमींना 'इंग्रजी शाळा वाचवा' म्हणून मोहीम राबवावी लागली नाही तरच नवल!

इंग्रजी शाळांकडे मुख्यतः इंग्रजी बोलण्याच्या आकर्षणातून, प्रतिष्ठेच्या मुद्द्यावरून आणि इंग्रजी शाळांच्या झगमगाटाला भुलून जाणाऱ्यांची संख्या जास्त आहे. बहुतेक घरांत मराठी बोलले जाते, पण त्यांतील काही घरांमध्ये मुलांसाठी मात्र इंग्रजी शाळा निवडली जाते, आणि म्हणूनच हा लेखनप्रपंच.

प्रथम मराठी माध्यमाचे फायदे पाहू या –

शिक्षणशास्त्र सांगते, आपण घरात ज्या भाषेत बोलतो त्याच भाषेत मुलांना शिकवावे. असे केल्यास मुलांना शिकवलेले लवकर समजते, पाठांतर कमी करावे लागते, दुसरी भाषा अवगत करण्यास सुलभता येते, अभ्यास कमी वेळेत होतो आणि राहिलेला वेळ इतर छंदांकरता देता येतो. हे सर्व फायदे मराठी माध्यमाच्या शाळांमध्ये मिळतातच, शिवाय बहुसंख्य मराठी शाळा अनुदानित असतात आणि त्यामुळे तिथे शिकवणारा शिक्षकवर्ग नियमाप्रमाणे पूर्ण शिक्षित असतो, इतर ठिकाणी अशी सुविधा मिळेलच याची खात्री आपल्याला देता येत नाही. इंग्रजी शाळांच्या दर्जाबाबत अनेक भयानक बाबी रोज वर्तमानपत्रांत छापून येत असतात, ते वाचून सुज्ञ पालकांना धडकी भरल्याशिवाय राहत नाही.

काही दिवसांपूर्वी ३ वर्षांच्या चिमुरडीचा रडतानाचा व्हिडीओ सोशल मीडियावर व्हायरल झाला होता. एवढ्याशा मुलीशी तिच्या शिक्षिका इंग्रजीतून संवाद साधत होत्या. त्या मुलीला समजत नव्हते म्हणून ती रडत होती, आणि त्या शिक्षिका फिदीफिदी हसत होत्या. शेवटी त्या शिक्षिका ज्यावेळी त्या मुलीशी मराठीतून बोलल्या तेव्हा ती मुलगी चटकन मराठीतून बोलायला लागली आणि तिने रडण्याचे कारणदेखील सांगितले – तिला भूक लागली होती! सुशिक्षित नवपालकांनी यावरून काहीतरी बोध घ्यावा आणि मातृभाषेचे महत्त्व लक्षात घ्यावे.

एक अभ्यास सांगतो, की एखाद्या भाषेतले ८०० शब्द तुम्हांला समजले की तुम्हांला ती भाषा कळू लागते, बोलता येते. मग इंग्रजीच्या बाबतीत काही पालकांच्या मनात इतकी भीती का आहे हे समजायला मार्ग नाही! नक्की इंग्रजी शिकण्याची योग्य पद्धत आहे तरी कशी? इंग्रजी शिकण्यासाठी इंग्रजी शाळांमध्ये प्रवेश घेणे गरजेचे आहे का? असे प्रश्न सर्वसामान्य पालकांच्या मनात येणे आणि त्यांची द्विधा मनःस्थिती होणे स्वाभाविक आहे.

सर्वप्रथम अशा पालकांनी एक गोष्ट समजून घेणे गरजेची आहे, ती म्हणजे तुमच्या पाल्याला 'इंग्रजी भाषा' विषय म्हणून शिकायची आहे! त्यासाठी सर्व इतर विषय उदा० इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र इत्यादी इंग्रजीतून शिकणे गरजेचे नाही! तुम्ही का तुमच्या पाल्याला इंग्रजी विषय शिकण्याकरता, इतर विषयदेखील इंग्रजीतून शिकवताय? कुठेतरी चुकताय, हे लक्षात येतंय का तुमच्या?

मातृभाषा पक्की असेल तर दुसरी भाषा शिकणे सोपे : इंग्रजी शिकण्याकरता प्रथम तुम्हांला मराठी शिकणे गरजेचे आहे कारण, ती तुमची मातृभाषा आहे! ऐकून आश्चर्य वाटलं ना? होय! हेच खरं आहे.

शब्द, वाक्यरचना, नाम, सर्वनाम, क्रियापद, क्रियाविशेषण अशा अनेक व्याकरणातल्या संकल्पना अगोदरच पक्क्या झालेल्या असतील तर वेगवेगळ्या भाषा शिकणे अवघड जात नाही कारण, सर्व भाषांचा संकल्पनात्मक आधार एकच असतो. म्हणूनच मूलगामी अर्थाने आपण भाषा एकदाच शिकतो असे म्हटले जाते. त्यामुळे आपल्या मुलांना प्रथम भाषा – मातृभाषा – मराठी चांगली बोलता-लिहिता-वाचता येणे गरजेचे आहे. यावर मराठी माध्यमातून शिकलेले काही लोक म्हणतील, मग आम्हांला इंग्रजी का जमत नाही? तर त्याला सराव, इंग्रजीची भीती, नावड इत्यादी अनेक कारणे असू शकतात.

आज इंग्रजीला समोर ठेवून मुलांना तयार करण्यासाठी इंग्रजी माध्यमात घातले आणि काही वर्षांनी चिनी भाषेचे प्राबल्य जगाच्या बाजारात वाढले तर काय करणार? तुमच्या पाल्याचे शिक्षण मातृभाषेतून न झाल्याने त्याच्या भाषिक संकल्पना कच्च्या राहिल्या असतील, व्याकरण कच्चे राहिले असेल, तर चिनी भाषा किंवा इतर कोणतीही भाषा शिकणे त्याला प्रचंड अवघड जाईल! अमेरिकेतील पनामा प्रांतातील सर्व शाळांमध्ये भविष्याचा विचार करून प्राथमिक स्तरापासूनच चिनी भाषा शिकवण्यास प्रारंभ केलेला आहे यावरून आंतरराष्ट्रीय स्तरावर चिनी भाषेचे वाढते महत्त्व लक्षात येईल. चिनीच नाही तर उद्या जर्मन, जपानी, रशियन... कोणतीही भाषा शिकावी लागली तरीही त्याकरता अगोदर मातृभाषा पक्की असावी लागेल.

**ब्रिटिश काउन्सिल आणि युनेस्कोचा मातृभाषेचा आग्रह**

ब्रिटिश काउन्सिल आणि युनेस्को या दोन्हीही आंतरराष्ट्रीय संस्था मातृभाषेतूनच शिक्षणाचे समर्थन करतात. अनेक भाषा कशा शिकाव्यात यासाठी ब्रिटिश काउन्सिलने 'टीचर एज्युकेटर कॉन्फरन्स २०१३' म्हणजेच 'टेक २०१३'च्या संमेलनात एक उत्कृष्ट तक्ता सादर केला होता. हा तक्ता आपल्याला गूगलवरून सहज मिळू शकतो. त्याचं मराठी रूपांतर खालीलप्रमाणे करता येईल –

१. मराठी श्रवण, वाचन, वक्तृत्व यांवरील प्रभुत्त्व आणि आत्मविश्वास वाढवा.

२. अध्यापनासाठी मराठी भाषेचा वापर करा. मराठी वाचन, वक्तृत्वासोबतच लेखनकौशल्यांचा विकास करा.

३. मराठीतून अध्यापन आणि मुलांचा भाषिक विकास साधताना इंग्रजीची ओळख करून द्या.

४. मराठीतून अध्यापन आणि मुलांचा भाषिक विकास साधताना, इंग्रजीचे वाचन, लेखन, आणि वक्तृत्वकौशल्य वाढवा.





अनुक्रमणिका

५. मराठी व इंग्रजीतून अध्यापन करा, तसेच भाषिक कौशल्ये, संकल्पना पक्क्या करून घ्या आणि तृतीय भाषेची ओळख करून द्या.

६. मराठी व इंग्रजीतून अध्यापन करताना व मुलांना दोन्ही भाषांमध्ये पारंगत करताना, तृतीय भाषेची भाषिक कौशल्ये विकसित करा.

७. सर्व भाषांचा आयुष्यभर ज्ञानार्जनासाठी उपयोग करा.

याला भाषाशिक्षणाची सप्तपदी असे म्हटले जाते. शिक्षणशास्त्राची पदवी घेतलेले मराठी शाळांमधले शिक्षक साधारण याचप्रकारे मुलांना शिकवतात, परंतु मातृभाषेतून शिक्षणालाच फाट्यावर मारून गल्लीबोळात तयार झालेल्या इंग्रजी शाळांमध्ये अशा प्रकारे शिकवले जाते का, यावर पालकांनी विचार करावा.

आज अनेक मराठी माध्यमाच्या शाळांमध्ये SIEM सारख्या शासकीय संस्थांच्याद्वारे शिक्षकांचे पण इंग्रजी उत्कृष्ट व्हावे याकरता 'तेजस'सारखे उपक्रम सुरू आहेत. तेजस उपक्रमामध्ये टाटांचे सहकार्य देखील मिळालेले आहे. याचा लाभ केवळ मराठी माध्यमाच्या शिक्षकांनाच मिळत आहे, ही गोष्ट आवर्जून लक्षात घेण्यासारखी आहे.

ज्यांनी अजूनदेखील मराठी माध्यमातून शिक्षणाचा विचार केला नाही त्यांनी आपल्या पाल्याकरता मराठी माध्यमाची शाळा आवर्जून निवडावी असे आवाहन करावेसे वाटते. कमी पैशात दर्जेदार इंग्रजी आणि इतर विषय शिकायचे असतील तर मराठी शाळांना पर्याय नाही. इंग्रजी शाळांच्या झगमगाटाला बळी न पडता आपल्या परिसरातील मराठी शाळेत प्रवेश घ्या. इंग्रजी माध्यमात शिकवताना पुढच्या १० वर्षांत खर्च होणाऱ्या पैशापेक्षा, थोडे सावध राहून आपल्या पाल्यासाठी मराठी माध्यमातून शिक्षणाचा योग्य निर्णय घेतला तर आपले लाखो रुपये वाचू शकतात आणि मातृभाषेच्या भक्कम पायावर इंग्रजीची इमारत डौलात उभी राहू शकते.

■

प्रस्तुत लेखाचा चर्चासत्रामध्ये समावेश नव्हता; तो बऱ्याच काळानंतर – अगदी अलीकडे 'भाषा आणि जीवन'कडे आला होता. त्यामुळे त्याला परिशिष्टामध्ये स्थान देण्यात आले आहे. - संपादक





अनुक्रमणिका

## लेखक-परिचय

**इनामदार**, उन्मेष रामचंद्र, जी०डी० आर्ट (उपयोजित), डिप्लोमा इन आर्ट एज्युकेशन. नऊ वर्षे इंग्रजी माध्यमाच्या माध्यमिक शाळांमध्ये कला विषयाचे अध्यापन. १९९७मध्ये डोंबिवली येथे एक्सलंट आर्ट अकादमी स्थापना करून कला, उपयोजित कला व स्थापत्य या विषयांचे विद्यार्थ्यांना मार्गदर्शन.

टपाल-पत्ता: 'श्रीराम वसंत' पांडुरंगवाडी, डोंबिवली (पूर्व) 421 201.
स्थिरभाष: (0251)2420 957, चलभाष: 90299 98829
ई-पत्ता: unmeshinamdar@gmail.com

**करंदीकर**, प्रा० सुमन, एम०ए०, एम०एड०, पीएच०डी०, शालेय शिक्षक, अध्यापक आणि प्राध्यापक म्हणून सेवाकाल पूर्ण. राज्य साधन केंद्राच्या (भारतीय शिक्षण संस्था) संचालक. 'आपणच' ह्या स्वयंसेवी संस्थेच्या अध्यक्ष. जपान. फिलिपिन्स, नेपाळ, दक्षिण आफ्रिका, बांगलादेश इत्यादी देशांना शैक्षणिक भेटी. तेथील विद्यार्थ्यांना एम०फिल० व पीएच०डी० पदवीसाठी मार्गदर्शन. NIEPA आणि NCERT ह्या उच्चस्तरीय शैक्षणिक संस्थांशी निगडित. महाराष्ट्र राज्याच्या अभ्यासक्रम समितीत कामाचा प्रदीर्घ अनुभव. सूक्ष्म-अध्यापन, रचनावादी दृष्टिकोण, शैक्षणिक मूल्यमापन ह्या विषयांवरील पुस्तकांचे लेखन. 'आपणच' ह्या शैक्षणिक नियतकालिकात नियमित लेखन. मराठी माध्यमाच्या इयत्ता दुसरी ते आठवीपर्यंतच्या विद्यार्थ्यांच्या लेखनकौशल्याचा विकास ह्या विषयावरील एका प्रकल्पाच्या कामात व्यग्र.

टपाल-पत्ता: 47/731 लोकमान्यनगर, पुणे 411 030.
स्थिरभाष: (020)2433 2516, चलभाष: 98605 02587
ई-पत्ता: suman.karandikar@gmail.com

**कोलटकर**, (डॉ०) शीला, एम०ए०(वाङ्मय), एम०ए०(शिक्षणशास्त्र), पीएच०डी० (शिक्षणशास्त्र). प्रशाला-शिक्षक म्हणून सेवानिवृत्ती. प्राथमिक शाळेपासून ते वरिष्ठ महाविद्यालयीन विद्यार्थी-विद्यार्थिनींची शिक्षिका म्हणून २८ वर्षांचा अध्यापन-अनुभव. 'आपणच' या नियतकालिकाच्या सहसंपादक.

टपाल-पत्ता: 'उमा निवास', सुभाषनगर तिसरी गल्ली, 1185 शुक्रवार पेठ, पुणे 411 002.
स्थिरभाष: (020)2448 2520, चलभाष: 97663 75694
ई-पत्ता: sheelakolatkar@gmail.com

**गोरे**, अनिल, गणित विषयातील शास्त्रपारंगत (एम०एससी०) पर्यंत. मराठीतून गणित विषयाचे अध्यापनकार्य चालू. उच्च माध्यमिक शिक्षणाच्या शास्त्रशाखेतील भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र व जीवशास्त्र ह्या विषयांची क्रमिक पुस्तके मराठीतून प्रसिद्ध. महाराष्ट्र शासनाच्या भाषा सल्लागार मंडळाचे सभासद.
टपाल-पत्ता: समर्थ मराठी संस्था, 705 बुधवार पेठ, पुणे 411 002.
चलभाष: 94220 01671
ई-पत्ता: marathikaka@gmail.com
**दुवेदी**, गीता जयंत, बी०ए०(मानसशास्त्र), १९८७पासून शिक्षणक्षेत्रात कार्यरत. १९८७ साली धनकवडी येथे बालवाडीची स्थापना, तर १९९३ साली समर्थ विद्यालयाची स्थापना (इयत्ता पहिली ते सातवीसाठी सरकारमान्य प्राथमिक शाळा). सुमारे ३० वर्षे अर्धग्रामीण भागात शिक्षणप्रसार व इतर समाजिक उपक्रमांत कार्यरत.
टपाल-पत्ता: समर्थ विद्यालय, धनकवडी, पुणे 411 043.
स्थिरभाष: (020)2436 7049, चलभाष: 98230 81558
ई-पत्ता: gogojd@gmail.com
**देशपांडे**, (डॉ०) व०सी०, प्रथम माध्यमिक शिक्षक, नंतर शिक्षणशास्त्र महाविद्यालयात अध्यापकाचार्य. १९९० ते १९९८ ह्या काळात संचालक, शिक्षणाभ्यासकेंद्र, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन. १९७९पासून पुणे विद्यापीठात अध्यक्ष - शैक्षणिक मानसशास्त्र अभ्यासमंडळ, अधिष्ठाता - शिक्षणशास्त्रविद्याशाखा, सदस्य - विद्यापरिषद, कार्यकारणी इत्यादी. राष्ट्रीय पातळीवर NCERT, NCTEवर तज्ज्ञ म्हणून सहभाग, चीन व जपान येथील चर्चासत्रात सहभाग. महाराष्ट्र राज्याच्या डी०एड० माध्यमिक स्तर आणि प्राथमिक स्तरावरील अभ्यासक्रम निर्मितीत सहभाग.
टपाल-पत्ता: A-2/5 गजेंद्रनगर, दत्तवाडी, पुणे 411 030.
स्थिरभाष: (020)2433 6302, चलभाष: 98811 45538
ई-पत्ता: vaseede@gmail.com
**पटवर्धन**, विद्या, एम०ए०, एम०फिल०, नारळकर फाउंडेशन या संस्थेच्या कार्यवाह. सर्जनशील शिक्षणात रस असणाऱ्या समविचारी व्यक्तींना एकत्र जमवून 'अक्षरनंदन' ही शाळा सुरू करण्यात आणि पुढे नेण्यात महत्त्वाचा वाटा. 'परिसर' या पर्यावरणविषयक काम करणाऱ्या गटात सहभागी.
टपाल-पत्ता: 'अक्षरनंदन' शाळा, सर्व्हे क्र० 103, बहिरटवाडी, शिवाजी हाउसिंग सोसायटी, सेनापती बापट रस्ता, पुणे 411 016.





अनुक्रमणिका

स्थिरभाष: (020)2563 2224, 2563 7513, चलभाष: 98905 86835
ई-पत्ता: aksharvidya@gmail.com

**राईलकर,** (प्रा०) मनोहर रामचंद्र, बी०एस्सी० (गणित), एम०एससी० (सांख्यिकी). १९५५पासून पुणे येथील स०प० महाविद्यालयात गणिताचे प्राध्यापक. १९८९मध्ये निवृत्त. नू०म०वि० मराठी व शिशुशाळा प्रमुख, मुलींच्या शिशु व प्राथमिक शाळांचे प्रमुख, मूकबधिर विद्यालयाचे प्रमुख असा शालेय अध्यापनाचा प्रदीर्घ अनुभव. गणितावरची अनेक पुस्तके प्रसिद्ध. बालभारती गणित समिती मानद सभासद ११-१२ वर्षे, माध्यमिक शाळा मंडळ, गणित अभ्यास मंडळ ह्यांचे ११ वर्षे सभासद. विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळाचे स्वीकृत सभासद.

टपाल-पत्ता: 'मृण्मयी' 59 जेधेनगर, बिबवेवाडी, पुणे 411 037.
स्थिरभाष: (020)2422 0566, चलभाष: 98220 67619
ई-पत्ता: railkar.m@gmail.com



## लेखकांसाठी सूचना

१. पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे : मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये इ०) भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय / परीक्षणे.

२. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :

(अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे.

(आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावीत.

(इ) लेखाच्या अखेरीस स्वत:ची ओळख (शिक्षण, व्यवसाय इ०) एकदोन वाक्यांत लिहावी. त्याचप्रमाणे स्वत:चा पत्ता व स्थिरभाष क्रमांक, चलभाष क्रमांक व ई-पत्ता द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी क्रमांक जरूर कळवावा.)

(ई) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावीत. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

३. लेखनासंबंधीचा निर्णय एक ते तीन महिन्यांत कळवला जातो. टपाल तिकिटे जोडलेली असतील तर (आणि तरच) नापसंत लिखाण परत पाठवले जाते.

४. लेखनाला अल्प मानधन दिले जाते.

